
नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)



महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com



# निवेदन



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. २८९,
एप्रिल-मे-जून १९९९



वरा तो एकचि धर्म । जगाला प्रेम अर्पावे ।।

: २४ डिसेंबर, १८९९ सानेगुरुजी जन्मशताब्दी निधन : ११ जून, १९५०

अनुक्रमणिका



अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २८९

एप्रिल-मे-जून १९९९

□

संपादक

ह. ल. निपुणगे

□

**संपादन समिति**

राजा फडणीस (प्र. कार्यवाह)

प्रा. श्रीराम पुजारी

डॉ. वि. भा. देशपांडे

डॉ. ल. रा. नसिराबादकर

डॉ. अंजली सोमण

प्रकाश होळकर

□

**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रोड,

पुणे ४११ ०३०.

दूरध्वनी : ४४७५९६३

अनुक्रमणिका



# अनुक्रमणिका

□



□

मुद्रक-प्रकाशक : राजा फडणीस, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रोड पुणे ४११ ०३०.
मुद्रणस्थळ : जंगम ऑफसेट प्रा. लि., २५/१०, नांदेड फाटा, पुणे ४११ ०४१.
मुखपृष्ठ रचना : स. म. जंगम
संगणकीय अक्षरजुळणी : यशश्री एंटप्रायजेस, कोथरूड, पुणे ४११ ०२९.
मूल्य : रुपये तीस वार्षिक वर्गणी संस्थांसाठी : शंभर रुपये.
आजीव सदस्य शुल्क : रु. ५००/- वार्षिक सदस्य शुल्क : रु. ५०/-
अंक क्र. २८९ - एप्रिल-मे-जून १९९९
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले आहे.

# संपादकीय

□

ह. ल. निपुणगे

दिनांक १० मार्च १९९९. कुसुमाग्रजांचे निधन झाल्याची बातमी दूरध्वनीवर समजली. मन सुन्न झाले. त्यांच्या अनेक कविता आठवू लागल्या. 'गर्जा जयजयकार क्रांतीचा गर्जा जयजयकार', 'नवलाख तळपती दीप विजेचे येथं।', 'काढ सखे गळ्यातील तुझे चांदण्याचे हात', 'कोलंबसाचे गर्वगीत', 'पृथ्वीचे प्रेमगीत' अशा कितीतरी. पण एक ओळ मात्र मनात सारखी घोळत राहिली. 'प्रेम कुणावरही करावे.'

याला कारण एकच, कुसुमाग्रजांनी सर्वांवर प्रेम केले. त्यांना भेटायला गेलेल्या प्रत्येकावर. मग त्याची पूर्वीची ओळख असो वा नसो. तो एक 'माणूस' म्हणून ते त्याच्यावर प्रेम करीत. प्रेमाने स्वागत करीत. अलिकडच्या काळात अनेक कविमंडळी आपल्या आगामी कवितासंग्रहाची हस्तलिखित प्रत घेऊन त्यांच्याकडे जात. आपल्या कविता त्यांना ऐकवीत. कुसुमाग्रज आनंदाने त्या ऐकत. कवितेची वही मागून घेऊन त्यातील कविता वाचीत. वाचून समाधान व्यक्त करीत. शुभेच्छा देत. मग कवी अथवा कवयित्री हळूच म्हणे - 'आपण या संग्रहाला आशीर्वादपर लिहावे अशी मनापासून अपेक्षा आहे.'

कुसुमाग्रज क्षणभर विचार करीत. मग म्हणत, लिहून पाठवतो, हस्तलिखिताची प्रत ठेऊन घेत. यथाकाळ आशीर्वादपर पत्र येत असे. त्यात त्यांनी कवीचे कौतुक केलेले असे. अशी पत्रे अनेक कवितासंग्रहांवर छापलेली अनेकांनी पाहिली असतील.





अनुक्रमणिका



माणसांवरच नव्हे तर निसर्गावर, प्राण्यांवर, सौंदर्यावर त्यांचे नितांत प्रेम होते. को
चार चांगल्या कविता लिहितो, तो आदराने आपल्याकडे येतो, आपल्याला कवि
दाखवितो, आपण त्या वाचनाचा आनंद उपभोगतो यात त्यांना खूपच समाधान वाट
असे. त्यांनी पाठविलेल्या पत्रांतून ते दिसत असे.

'विशाखा' हा त्यांचा काव्यसंग्रह माझा अत्यंत आवडता. मी संपादित कर
असलेल्या 'विशाखा' दिवाळी अंकासाठी प्रसिद्ध प्रकाशक कै. अनंतराव कुलक
यांच्यावर एक पुरवणी प्रकाशित केली होती. या पुरवणीसाठी अनेक नामवंत साहित्यिकां
कै. अनंतरावांच्या आठवणी लिहिल्या होत्या. त्यात मी कुसुमाग्रजांनाही पत्र लिहि
होते. त्यांनी अत्यंत मनापासून लिहिलेल्या अनंतरावांच्या आठवणी पाठविल्या. त्या
अगदी मी दिलेल्या मुदतीत.

कुसुमाग्रजांनी जसं कवी, लेखक, वाचक यांच्यावर प्रेम केलं, तसंच आपल्
प्रकाशकांवरही केलं. त्यांच्या या अनंतरावांच्या आठवणी अत्यंत जिव्हाळ्याच्या होत्या
ज्यांनी हा विशाखाचा दिवाळी अंक वाचला असेल त्यांना ते नक्कीच पटेल. म. सा
परिषदेने आयोजिलेल्या कुसुमाग्रज श्रद्धांजली सभेत बोलताना 'कॉन्टिनेन्टल'चे
श्री. अनिरुद्ध कुलकर्णी यांनी तात्यासाहेबांसंबंधी त्यांना वाटणारी आपुलकी व्यक्
करताना असे म्हटले की, 'तात्यांची आठवण सतत राहावी म्हणून मी माझ्या मुला
'तात्या' म्हणतो', लेखक-प्रकाशकाचे इतके आपुलकीचे संबंध दोन पिढ्यांतही राहतात
ह्याचे श्रेय कुसुमाग्रजांच्या या प्रेमळ स्वभावालाच आहे.

कवी म्हणून तर ते अग्रेसर होतेच. परंतु त्यांनी लिहिलेली 'नटसम्राट' सारखी अने
नाटके वैशिष्ट्यपूर्ण ठरली. कादंबरी, एकांकिका, कथासंग्रह, ललित निबंध, समीक्षा
साहित्याच्या विविध प्रकारातही त्यांनी उत्तम लेखन केलेले आहे. ते सर्व वाचकांच्
मनाला भिडले आहे. लेखक-कवी म्हणून ते सर्वमान्य होतेच. पण 'माणूस' म्हणून
सर्वोत्तम होते.

*'प्रेम कुणावरही करावं.*
*कारण -*
*प्रेम आहे माणसाच्या संस्कृतीचा सारांश*
*त्याच्या इतिहासाचा निष्कर्ष*
*त्याच्या अभ्युदयाची आशा*
*एकमेव !'*

*या त्यांच्या कवितेतील ओळी सतत आठवत राहातात.*

कुसुमाग्रजांना मन:पूर्वक श्रद्धांजली.



अनुक्रमणिका

सानेगुरुजी जन्मशताब्दी विशेष लेख

□

# सानेगुरुजी आणि 'साधना'

□

ग. प्र. प्रधान

सानेगुरुजींनी भारताच्या स्वातंत्र्य संग्रामात १९३० पासून १९४७ पर्यंत समर्पण भावनेने काम केले. आठ वर्षांहून अधिक काळ कारावास भोगला. सानेगुरुजींनी भाषणातून, लेखनातून पारतंत्र्याविरुद्ध लढण्यासाठी अनेकांना प्रेरणा दिली. असंख्य युवकांच्या मनात देशभक्तीची ज्योत प्रज्वलित केली. गुरुजींची त्यावेळची भाषणे ऐकणे हा एक अपूर्व अनुभव असे. 'श्यामची आई'मधून प्रेम आणि करुणा यांचे चित्रण करणारे सानेगुरुजी, लहान मुलांना गोष्टी सांगून त्यांचे रंजन करणारे सानेगुरुजी हा त्यांच्या जीवनाचा एक पैलू होता. स्वातंत्र्य चळवळीतील झुंजार योद्धे हे त्यांचे दुसरे रूप होते. त्यांच्या अंत:करणातील पारतंत्र्याबद्दलचा संताप दाहक शब्दातून प्रगट होई. भाषण करताना त्यांच्या वाक्यावाक्यामधून वीज तळपत असे.

स्वातंत्र्य मिळविण्यासाठी 'येथून तेथून सारा पेटू दे देश' ही भावना जळजळीत शब्दांमध्ये सानेगुरुजी व्यक्त करीत. श्रोते



भारावून जात. भारतमातेला मुक्त करण्यासाठी आपण स्वातंत्र्य चळवळीत उडी घेतली पाहिजे, अशी ऊर्मी श्रोत्यांच्या मनात उसळत असे. १९४७ साली स्वातंत्र्य मिळाल्यावर सानेगुरुजींच्या मनातील एक स्वप्न साकार झाले. त्याच वेळी स्वराज्याचे सुराज्य करण्याचे स्वप्न भारतीयांच्या मनात निर्माण झाले पाहिजे, असे सानेगुरुजींना तीव्रतेने वाटले. हे करण्यासाठी वृत्तपत्र हेच प्रभावी साधन आहे, याची सानेगुरुजींना जाण होती. असे वृत्तपत्र काढण्याची ओढ त्यांच्या मनात निर्माण झाली आणि यातूनच १५ ऑगस्ट १९४८ ला 'साधना' साप्ताहिकाचा जन्म झाला.

'साधना'च्या पहिल्या अंकात सानेगुरुजींनी त्यांची भूमिका मांडणारे निवेदन केले आहे. त्यातील पुढील काही भागावरून सानेगुरुजींच्या मनोभूमिकेवर प्रकाश पडेल. सुरुवातीस सानेगुरुजी लिहितात :

'आज १५ ऑगस्ट. स्वातंत्र्याचे बाळ जन्मून एक वर्ष झाले. किती आपत्तीतून हे बाळ वाढत आहे. संमिश्र भावनांचा सिंधू हृदयात उसळतो. उंचबळतो. परंतु आवेग आवरून विवेकाने कामाला लागले पाहिजे.'

सानेगुरुजी पुढे लिहितात :

'स्वातंत्र्य' म्हणजे सर्वांच्या विकासाला संधी. स्वातंत्र्य म्हणजे सुखसंपन्न होण्याचे साधन. अत:पर या देशात सर्वांना स्वाभिमानाने जगता येऊ दे. ज्ञान-विज्ञानाचा प्रकाश सर्वत्र जाऊ दे. स्वच्छता, आरोग्य येऊ दे. उपासमार जाऊ दे. सर्वांना अन्न, वस्त्र मिळो. रहायला साधेसुधे घरदार असो. नको वशिला, नको लाचलुचपत. सर्वांची मान सरळ होऊ दे. सर्वांनाच वाव असू दे.'

सानेगुरुजी नंतर लिहितात :

'स्वातंत्र्यात एक नवे युग आपल्या आणायचे आहे. हे महान कार्य आहे. त्या सर्वांना संयम पाळायला शिकले पाहि स्वातंत्र्य म्हणजे स्वैराचार नाही. स्वा म्हणजे जबाबदारी. आपण एकमेकां भावना ओळखायला शिकले पाहिजे. स सन्मानिले पाहिजे. विशाल दृष्टी, व्या सहानुभूती यांची अत्यंत आवश्यकता अ तरच संस्कृती फुलेल, मानवता फुलेल.'

निवेदनाच्या शेवटी सानेगुरुजी लिहित

'वैरभाव नि विषमता नष्ट करण्याची 'साधना' आपणास करावयाची आहे. 'साधना' साप्ताहिक या ध्येयाने जन्मत आहे ...या साप्ताहिकाचे स्वरूप कसे असे निरनिराळ्या भाषातील मौलवान प्रकार तुम्हाला दिसतील. देशातील नि जगातील संस्कृतीचे गंध तुम्हाला दाखवण्यात येती नाना धर्मांतील सुंदरता, उदात्तता यांची भेट होईल. शेतकरी, कामगार यांच्या जगा आपण येथे वावरू. त्यांचे प्रश्न च शिक्षणाच्या क्षेत्रात आपण जाऊ. मुलां संगतीत रमू. कधी येथे प्रश्नोत्तररूप महत्त्वा प्रश्नांवर चर्चा आढळेल. कधी आ साहित्याच्या मंदिरात जाऊ. कधी विज्ञाना पराक्रमी कथा ऐकू. कधी निर्मळ समाजवाद उपनिषद वाचू. मनात कितीतरी आहे. जे जमेल तेवढे करीन. ते गोड करून घ्या.'

सानेगुरुजींच्या निधनानंतर रावसा पटवर्धन आणि आचार्य जावडेकर 'साधना'चे संपादक झाले. यदुनाथ थत्ते त्यांच्या समवेत काम करीत. आचार्य जावडे यांच्या निधनानंतर आणि रावसाहेब पटव निवृत्त झाल्यानंतर यदुनाथ थत्ते यांनीच स

जबाबदारी घेतली आणि १९८० पर्यंत ती सांभाळली. आणीबाणीच्या काळात 'साधना'ने लोकशाहीचा उघड पुरस्कार केला आणि मुंबई हायकोर्टाच्या न्या. तुळजापूरकरांनी जजमेंट देताना 'साधना'ची भूमिका देशाहिताची होती, हे मान्य केले. आणीबाणीतील 'साधना'चे कार्य हाच सानेगुरुजींचा खरा वारसा होता. १९८० नंतर नानासाहेब गोरे हे 'साधना'चे संपादक झाले आणि १९८४ ते १९९८ या काळात वसंत बापट आणि ग. प्र. प्रधान यांनी संपादनाची धुरा सांभाळली. आता डॉ. नरेंद्र दाभोळकर हे संपादक आहेत. १९९८ च्या १५ ऑगस्ट पासून 'साधना'चे सुवर्ण महोत्सवी वर्ष सुरू आहे. सानेगुरुजींनी सुरू केलेली साधना पन्नास वर्षांहून अधिक काळ अखंड चालू आहे. सानेगुरुजींचे सहकारी विचारवंत आणि स्वातंत्र्य चळवळीत सानेगुरुजींच्या पासून प्रेरणा घेतलेले यदुनाथ थत्ते, वसंत बापट, सदानंद वर्दे, प्रधान आदि त्यांचे अनुयायी यांनी 'साधना'मधून सानेगुरुजींनी जी वैचारिक भूमिका मांडली, ज्या मूल्यांशी सानेगुरुजींची बांधिलकी होती, त्या मूल्यांवर आधारलेली गुरुजींची वैचारिक भूमिका आजवर चालवली आहे.

येथे सानेगुरुजींच्या पत्रकारितेसंबंधी काही सांगणे आवश्यक वाटते. सानेगुरुजींच्या साहित्यामध्ये केवळ आत्माविष्कार ही प्रेरणा नाही. त्यांच्या मनात जे भावतरंग निर्माण होत, ते वाचकांच्या मनात निर्माण व्हावेत ही साने गुरुजींच्या मनाची ओढ आहे. त्यांना जे विचार पटत, ते जनसामान्यांना सुलभतेने सांगावे यासाठी सानेगुरुजींनी 'भारतीय संस्कृती' आणि अन्य वैचारिक साहित्य लिहिले. त्यांच्या पत्रकारितेत हीच वाचकाशी संवाद करण्याची भूमिका आहे. सानेगुरुजी अंमळनेरला शिक्षक असताना विद्यार्थ्यांसाठी 'विद्यार्थी' हे हस्तलिखित चालवीत. सर्व मजकूर गुरुजीच लिहीत. मुलांना विविध विषयांची माहिती देणे, त्यांच्या मनावर सुसंस्कार करणे आणि त्यांचे रंजन करणे यासाठी सानेगुरुजी या हस्तलिखितामध्ये विविध तऱ्हेने साहित्य देत. सोप्या, सहजसुंदर भाषेत आशयघन मजकूर सानेगुरुजी लिहीत. पुढे सानेगुरुजी स्वातंत्र्य चळवळीत पडले. त्यावेळी महात्मा गांधी हे स्वातंत्र्य लढ्याचे नेतृत्व करीत होते आणि काँग्रेसद्वाराच चळवळ चालवीत होते. सानेगुरुजींनी त्यावेळी खानदेशमधील वाचकांसाठी 'काँग्रेस' हे वर्तमानपत्र काढले. त्यामधून ते स्वातंत्र्य या ध्येयाची प्रेरणा वाचकांना मिळावी असे लेखन करीत आणि शेतकरी व कामगार यांचे प्रश्न मांडीत असत. खानदेशमधील आणि महाराष्ट्रातील काँग्रेसच्या प्रस्थापित नेत्यांना सानेगुरुजींचे जहाल लेखन आवडत नसे. परंतु सानेगुरुजींनी त्याची फिकीर केली नाही. त्यांची पत्रकारिता हा उत्कट ध्येयवादी मनोवृत्तीचा आणि सुस्पष्ट विचारांचा आविष्कार होता. वाचकांशी त्यांचे अतूट आणि जिव्हाळ्याचे नाते होते. याचेच परिणत स्वरूप स्वातंत्र्य प्राप्तीनंतर 'साधना' साप्ताहिकामध्ये दिसले.

सानेगुरुजींचे व्यक्तिमत्त्व राजकीय पक्षांच्या चौकटीत मावणारे नव्हते. स्वातंत्र्य, समता आणि बंधुत्व या मूल्यांसाठी ते जगत होते आणि या मूल्यांच्या आधारेच त्यांनी वृत्तपत्रीय लेखन केले. सानेगुरुजींच्या निधनानंतरही 'साधना' कधी कोणत्याही

राजकीय पक्षाचे मुखपत्र बनले नाही; कारण त्यांच्यानंतर 'साधना' चालविणाऱ्या सर्व संपादकांना, सानेगुरुजींच्या पवित्र ध्येयवादी, मूल्याधिष्ठित पत्रकारितेचा वारसा चालवावयाचा असेल तर 'साधना' संकुचित होऊन चालणार नाही, राजकीय पक्षाभिनिवेशापासून ती दूर राहिली पाहिजे, याचे सतत भान होते.

वृत्तपत्रीय लेखन हे मुख्यत: प्रासंगिक असते. परंतु प्रासंगिक लिहितानाही ज्या पत्रकारांच्या लेखनास चिरंतनाचा स्पर्श होतो, तेच खरे थोर पत्रकार होत. सानेगुरुजी हे वर्तमानकालीन घटनांबद्दल लिहिताना भविष्याचा वेध घेत. तात्कालिक महत्त्व असलेल्या प्रश्नासंबंधी लिहितानाच शाश्वत सत्याचे दर्शन घडवीत. पत्रकार म्हणून लेखन करताना सानेगुरुजी मुख्यत्वे करून जनसामान्यांसाठी लिहीत. साहित्य लिहितानाही त्यांची तीच भूमिका असे. सानेगुरुजींना मराठीतील ललित साहित्याबद्दल असमाधान वाटे. कारण त्या साहित्यात सर्वसामान्य माणसांच्या, विशेषत: ग्रामीण भागातील साध्यासुध्या लोकांच्या जीवनाचे, भावभावनांचे प्रतिबिंब पडलेले नाही, असा त्यांचा आक्षेप होता. सानेगुरुजींना लोकसाहित्याबद्दल फार मोठे आकर्षण होते. म्हणूनच त्यांनी खेड्यापाड्यांतून फिरून स्त्रियांच्या ओव्या गोळ्या केल्या. सानेगुरुजींना एकनाथांची भारुडे फार आवडत. संतांच्या साहित्यातील भक्तिरसाप्रमाणेच संतांच्या लेखनामध्ये जनसामान्यांच्या हृदयाला स्पर्श करण्याचे जे सामर्थ्य होते, ते सानेगुरुजींना भावत असे. सानेगुरुजींनी कॉलेजमध्ये असताना इंग्रजीतील आणि इंग्रजीत भाषांतरित झालेले फ्रेंच, रशियन आदी भाषातील विपुल साहित्य वाचले होते. निसर्ग सौंदर्यावर प्रेमकरणाऱ्या सानेगुरुजींना वॉल्ट व्हिटमन आणि वर्डस्वर्थ यांचे काव्य फार आवडत असे. टॉलस्टॉय यांचे साहित्य आणि त्यांच्या जीवनातील परिवर्तन याबद्दल सानेगुरुजींना फार मोठे आकर्षण वाटे. त्यामुळेच त्यांनी रिसरेक्शन या कादंबरीचे भाषांतर केले. टॉलस्टॉय यांच्या What is Art या पुस्तकाचेही सानेगुरुजींनी भाषांतर केले, कारण टॉलस्टॉयच्या साहित्यविषयक भूमिकेचा प्रभाव गुरुजींच्या मनावर पडला होता. साहित्यातून वाचकांच्या मनावर नैतिक संस्कार व्हावा आणि सहानुभूतीच्या कक्षा विशाल व्हाव्यात, अशी सानेगुरुजींची साहित्यविषयक भूमिका होती.

सानेगुरुजींनी विविध भारतीय भाषातील साहित्यही विपुल वाचले होते. रवींद्रनाथ टागोरांच्या साहित्यावर त्यांचे फार प्रेम होते. त्यांनी टागोरांच्या कवितांचे केलेले जे रसग्रहण मी ऐकले आहे, ते अविस्मरणीय होते. टागोरांचे साहित्य हा भारतीय संस्कृतीचा उदात्त आणि सहजसुंदर आविष्कार आहे, असे सानेगुरुजी उत्कटतेने सांगत असत.

सानेगुरुजींचे जीवन आणि त्यांचे साहित्य तसेच पत्रकार म्हणून त्यांनी केलेले लेखन यांचा विचार एकत्रितच केला पाहिजे. सानेगुरुजींचे जीवन ही एक तपश्चर्या, साधना होती आणि 'साधना' साप्ताहिक हा त्यांच्या जीवनाचाच एक आविष्कार होता.

□

प्रा. ग. प्र. प्रधान
९२६, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.

सानेगुरुजी जन्मशताब्दी विशेष लेख

□

# सानेगुरुजींचे साहित्य : शाश्वत मूल्यांचा अविष्कार

□

प्रा. सुजाता शेणई

सानेगुरुजींनी स्फुट लेखन भरपूर केलं, परंतु त्यांचं स्वत:चं प्रेम काव्यावर आधिक होतं. ते स्वत: त्यांच्या कवितेबद्दल म्हणतात, 'या कविता म्हणजे माझे जीवन. या आधी प्रसिध्द करा. इतर पुस्तके पुढे प्रसिध्द होवोत वा न होवोत, (पत्री-प्रकाशकाचे निवेदन) स्वत:चे जीवन काव्यातून लोकांसमोर मांडणारे सानेगुरुजी अंतर्बाह्य एकजीव होते. सानेगुरुजीची विद्‌वत्ता, निस्वार्थी वृत्ती, मातृहृदय, परमेश्वरविषयक आस्तिक्यभाव, सेवालोभी मन, देशभक्ती ही सारी त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची वैशिष्ट्ये त्यांच्या काव्यामधून दिसून येतात.

कै. पांडुरंग सदाशिव साने उर्फ सानेगुरुजी यांचा एकमेव काव्यसंग्रह 'पत्री' हा होय. एकूण १६३ कविता असलेला हा कवितासंग्रह इ. स. १९३५ मध्ये अमळनेरला प्रसिद्ध झाला. आचार्य भागवत यांची दीर्घ प्रस्तावना आणि रामचंद्र कृष्ण लागू, वा. भा पाठक, के. ना. वाटवे, दत्तो वामन पोतदार, श्री. नी. चाफेकर आणि ना. गो. चाफेकर या विद्‌वानांचे अभिप्राय या काव्यसंग्रहात आहेत.

**सानेगुरुजींचा काव्यप्रवास कसा झाला?**

सानेगुरुजींच्या घरातील वातावरण हे सुसंस्कृत, परंपरावादी होतं. 'लहानपणी त्यांच्या आई-वडिलांकडून, आजीकडून अनेक ओव्या त्यांच्या कानावर पडायच्या. वडील रोज काही ओव्या पाठ करून घ्यायचे, त्यामुळे साहजिकच काव्याचा धागा गुंफायला सुरुवात झाली. सानेगुरुजी स्वत:ही एखादी ओवी रचत. शाळेत गेल्यानंतर त्यांना 'राधारमण' हे शिक्षक लाभले. त्यांनी गुरुजींच्या काव्यप्रवाहाला वाट करून दिली. शाळेत, महाविद्यालयात विद्यार्थ्यांसाठी मासिक काढताना त्यात त्यांनी स्वत:च्या काही कवितांची भर घातली. सानेगुरुजी कविता लिहित होते, पण काव्याचा गाभा त्यांना सापडला तो कारागृहात असताना! सानेगुरुजींच्या कविता जन्माला आल्या त्या धुळे, नाशिक, त्रिचनापल्ली या कारागृहात कारावास भोगत असताना आल्या आहेत.

मार्च १९३० मध्ये सानेगुरुजींनी स्वातंत्र्यलढ्यात उडी घेतली. शिक्षकी पेशाला व्यावहारिक दृष्ट्या रामराम ठोकला असला तरी सानेगुरुजी आयुष्यभर शिक्षकच होते. या स्वातंत्र्यसंग्रामात त्यांना अनेकदा अटक झाली. कारावास भोगला आणि त्यातून काव्यनिर्मिती झाली.

'पत्री' तील कवितांचा कालखंड हा इ. स. १९२५ ते १९३५ या दहा वर्षांतील आहे. या काळातील राजकीय पार्श्वभूमी ही गुरुजींच्या काव्याला पोषक ठरली. इ. स.



अनुक्रमणिका






*प्रा. सुजाता शेणई*
*मराठवाडा मित्रमंडळ वाणिज्य महाविद्यालयात गेली ५ वर्षे मराठी या विषयाचे अध्यापन करीत आहेत.*
*१९८८ मध्ये पुणे विद्यापीठातून बी. ए. पदवी. बी. ए.ला मराठी या विषयाचा विशेष अभ्यास करून पुणे विद्यापीठाचे सुवर्णपदक मिळाले.*
*एम. ए. १९९०, पुणे विद्यापीठ.*
*बी. एड. १९९२, पुणे विद्यापीठ.*
*महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या साहित्य विशारद या परीक्षेत सर्वप्रथम.*
*'केसरी', 'महाराष्ट्र टाईम्स' या दैनिकांतून परीक्षणात्मक लेखन.*
*'साहित्य सूची'मध्ये 'महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी' या सदरात लेखन.*
*अनन्वय फाऊंडेशन या संस्थेतर्फे कविवर्य कुसुमाग्रजांच्या साहित्यावर होणाऱ्या 'शब्दोत्सव' या कार्यक्रमाचे संहितालेखन केले आहे.*
*महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे होणाऱ्या का. र. मित्र व्याख्यानमालेत वक्ता म्हणून सहभाग.*

१९२० पासून स्वातंत्र्य चळवळीची धुरा गांधीजींकडे आली होती. गांधीजींच्या सत्य, अस्तेय, अहिंसा, सत्याग्रह, खादीचा वापर यांसारख्या सूत्रांचा सानेगुरुजींवर विलक्षण प्रभाव होता जो त्यांच्या कवितांमधून दिसतो. आजूबाजूची सामाजिक परिस्थिती ही निराशा आणणारी होती. ज्या भारतात सोन्याचा धूर निघत असे त्या भारतातील लोकांना पोटभर अन्न मिळत नाही हे पाहून सानेगुरुजींचे अंत:करण तळमळत असे. तो करुणमय सहजोद्‌गार सामाजिक कवितांतून येई. भारतमाता ही पारतंत्र्यात आहे तिला सोडविले पाहिजे या विचारातून देशभक्तीपर कविता जन्माला येतात. ईश्वरावरची निष्ठा आणि आईवरील नि:स्सीम प्रेम हे त्यांच्या ईश्वरविषयक आणि मातेविषयक कवितांतून दिसते. आचार्य अत्रे सानेगुरुजींच्या कवितेबद्दल लिहितात,

'गुरुजींचे जीवन असामान्य होते. जे केले तेच त्यांनी लिहिले आणि जे लिहिले तेच केले. त्यांचे काव्य त्यांच्या जीवनाची वि:श्वासिते आहेत.'

**'पत्री' हे शीर्षक का ठेवले?**

पत्री म्हणजे पाने, पण ही पाने भक्त परमेश्वराला भक्तिभावपूर्ण अर्पणच करीत असतो. या पानांना फुलांसारखा रंग, गंध नसेल पण परमेश्वराच्या चरणी पत्रम्, पुष्पम्, फलम्, तोयम् यापैकी काहीही भक्तिभावपूर्वक वाहिले की परमेश्वर संतुष्ट होतो अशी भक्ताची धारणा असते. सानेगुरुजी हेही या धारणेतून हा कवितासंग्रह परमेश्वराच्या चरणी अर्पण करतात. भक्ताच्या मनातील उत्कटता, स्नेहभाव, परमेश्वरावरील निष्ठा ही जितकी उत्स्फूर्त असते तितकी उत्फूर्तता या पत्रीला लाभली आहे. सानेगुरुजींनी स्वत:च्या हृदयातील सर्व जिव्हाळा ओतून जी काही लहान मोठी कवने केली, तीच ही पत्री. सानेगुरुजींचे त्यांच्या कवितांवर प्रेम होते. या कवितांची कोणी उपेक्षा करू नये एवढीच परमेश्वराजवळ ते प्रार्थना करतात. सानेगुरुजींची पत्री म्हणजे काव्याची सहजस्फूर्तता, कवीची शालीनता आणि भक्ती यांच्या संगम होय.

**सानेगुरुजींची ईश्वरविषयक कविता :**

सानेगुरुजींनी रामकृष्ण परमहंस, महात्मा

गांधी आणि रवींद्रनाथ टागोर यांना आपली दैवते मानली होती. आपल्या आयुष्यात रामकृष्णांची भक्ती आणि महात्माजींची सेवा अल्प प्रमाणात तरी उतरावी आणि रवींद्रांच्या काव्य गायनाप्रमाणे आपणही जीवनाची शुद्ध गीते थोडीफार गावीत या उद्दिष्टाने त्यांनी कवितांची रचना केली.

रामकृष्ण परमहंसांची सगुण भक्ती त्यांच्या ईश्वरविषयक कवितांतून दिसून येते. कवीच्या जीवनात इतर वृत्तींपेक्षा भक्ती प्राधान्य मिळवून राहिली आहे. आपल्या हृदयसिंहासनावर अभिनव रमणीय आणि गुणनिधान अशी प्रभूची मूर्ती सदैव विलसत राहावी अशी कवीची प्रार्थना आहे.

परमेश्वर आपला आधार आहे, त्राता आहे. परमेश्वराने जर आपला उद्धार केला नाही तर आपल्या जगण्याला अर्थ काय? असा प्रश्न कवी उभा करतात.

*'मजला तुझ्यावीण जगीं नाहिं कोणी ॥*
*देवा दयाळा*
*हतदीन बाळा*
*घेऊन जा ठेवि निज पूज्य चरणीं ॥*
*मजला ॥'*

परमेश्वराला भेटण्याची जी तळमळ संतांच्या साहित्यातून दिसून येते तीच तळमळ सानेगुरुजींच्या ईश्वरविषयक काव्यातून दिसते. संतांना संसारात रमणं रुचलं नाही. सानेगुरुजीही संसारापासून अलिप्त होते. संतांना ज्याप्रमाणे आजूबाजूची दुःख सलत होती त्याप्रमाणे सानेगुरुजींनाही सामाजिक दुःख क्लेशदायक होत होती. संतांची परमेश्वरावर निष्ठा, परमेश्वर म्हणजे सत्य-शिव-सौंदर्य, परमेश्वर प्राप्ती म्हणजे जीवनोद्धार, परमेश्वराचे स्तवन हे काव्यातून करायचे ही संतांची वैशिष्ट्ये सानेगुरुजींच्या काव्य-भूमिकेशी जुळणारी आहेत.

*'मी प्रभुराया ! त्वदंगणातिल वेल*
*काळजी कां न घेशील ॥*
*मी एका या बाजुस पडलों आहे*
*वाट त्वत्कृपेची पाहें*
*त्वत्करूणेचे जल थोडे तरि मिळूं दे'*

आपण अशुद्ध आहोत म्हणून परमेश्वर आपल्याला भेटत नाही. आपण शुद्ध झाल्यानंतर परमेश्वर आपल्याला भेटेल असा आशावादही व्यक्त करतात. 'पूजा मी करूं रे कैशी?' 'असो तुला देवा माझा सदा नमस्कार', 'मनो-मंदिर-राम', देवा झुरतो, हा दास यांसारख्या कितीतरी कविता परमेश्वराशी संवाद करणाऱ्या आहेत. 'पत्री' मधील 'फुलाची आत्मकथा' या कवितेत जीवनविषयक तत्त्वज्ञान आले आहे. श्रद्धा आणि तपस्या यांच्या आधाराने मानवी आत्मा परमेश्वरी प्रसादाला पात्र होतो ही सानेगुरुजींची धारणा होती. सानेगुरुजींची ईश्वरविषयक कविता ही परमेश्वराची श्रद्धा, भक्ती, परमेश्वर भेटावा म्हणून लागलेली तळमळ, स्वतःला शुद्ध करून घेण्याचा ध्यास या वैशिष्ट्यांनी युक्त आहे.

**सानेगुरुजींची सामाजिक कविता**

सानेगुरुजींचा मुळातला पिंड हा सामाजिक कार्यकर्त्यांचा होता. शिक्षकाची नोकरी सोडून देऊन सानेगुरुजी सत्याग्रहात उतरले. आदर्श समाजरचना हे त्यांचे स्वप्न होते. आजूबाजूची तत्कालिन सामाजिक परिस्थिती पाहून जी विफलावस्था त्यांच्या मनात दाटली ती त्यांनी कवितेतून व्यक्त केली. वर्ण, धर्म, जातिविरहित समाजव्यवस्था निर्माण करणं ही त्यांची इच्छा होती. पंढरपूरचे विठ्ठल मंदिर










## संस्कारी वाङ्मय — समाजाची गरज

कोणत्याही मानवी कर्तृत्त्वाची, सांस्कृतिक सर्जनाची सत्यता अंशाअंशानीच क्रमशः उघड होत जाते. उदयास्तांच्या दोन टोकांमध्ये कलाकलांनी होत जाणाऱ्या सौर-ऊर्जेच्या प्रकटनासारखेच मानवी कर्तृत्वाच्या सत्यदर्शनाचे उदयास्त क्रमशः उलगडत असतात. सानेगुरुजी हे या विसाव्या शतकाच्या पूर्वार्धाचे जसे एक प्रतिनिधी आहेत, तसेच देशाच्या राजकीय स्वातंत्र्यलक्ष्यी पण सर्वंकष सांस्कृतिक प्रबोधन पर्वाचे एक उत्कृष्ट अपत्यही आहेत. या पर्वाचा सखोल सर्वांगीण अभ्यास झालेला आहे, असे मला वाटत नाही. गुरुजी-ग्रहणात ही एक मोठी अडचण ठरते. पण एवढेच नाही. गुरुजींमध्ये एक चिवट सोशिक कोकण आहे, एका यशोदेचा एक श्याम आहे. एक अंतःस्थ राम आहे आणि जन्मदाती माता, भारतमाता व जगन्माता या तिघांचा रक्ताचा वारसा आहे. त्यांच्यात रामकृष्ण, म. गांधी व रवींद्रनाथ टागोर याही त्रिमूर्तींचा संस्कार आहे. भारतीय संस्कृतीत मुरलेल्या नैतिक मूल्यांचा निग्रही पुरस्कर्ता व प्रतिपादकही त्यांच्यात आहे. 'धडपड व धडपडणारी मुले' या साध्या भासणाऱ्या शब्दांना संकल्पनांची व तत्त्वज्ञानाची अभिनव कला प्राप्त करून देणारे एक आत्मबळही आहे. म्हणून गुरुजींना, त्यांच्या कर्मयोगाला, त्यांच्या वाङ्मयाला समजून घेणे एका वेळी जितके खूप सोपे वाटते, तितकेच दुसऱ्या वेळी खूप अवघड व गुंतागुंतीचेही वाटू लागते. या जन्मशताब्दी वर्षाच्या ऐतिहासिक टप्प्यावर गुरुजींनी घडविलेली काही धडपडणारी मुलेही आहेत आणि गुरुजींना प्रत्यक्षात न पाहिलेल्या किमान तीन नव्या पिढ्याही उपस्थित आहेत. या सर्वांनाच गुरुजी वेगवेगळ्या अर्थांनी स्वीकारता येतात. नाकारताही येतात. प्रश्न डोळस स्वीकार-नकारांचा नसतोच; तर तो आंधळ्या स्वीकार-धिक्कारांचा असतो. भालचंद्र नेमाड्यांसारखे अभ्यासक गुरुजी-साहित्याची मौलिक सत्यता नव्या रीतीने पटवून देत आहेत. पु. ल. देशपांड्यांसारखे गुरुजीभक्त १९७० नंतरच्या नव्या पिढीला गुरुजींचे जीवनवाङ्मय अधिक यथार्थतेने समजेल, अशी अटकळ व्यक्त करतात. गुरुजींसारख्या विभूती या नेहमीच एक व्यामिश्र व विकसनशील सत्यता असतात व त्यांना उत्तरोत्तर उलगडत जाणे, अर्थपूर्ण करणे ही एक न संपणारी सांस्कृतिक परंपरेच्या जडणघडणीची प्रक्रिया ठरते. गुरुजी-वाङ्मयावरील एकेकाळचे रडकेपणाचे व बुवाबाजीचे उथळ आक्षेप आता इतिहासजमा झाले आहेत. गुरुजी-वाङ्मयाची अखंड लोकप्रियता नेहेमीच अभ्यासनीय ठरेल. ध्येयवादी धडपड व धडपडणारी मुले हे समाजातील सनातन वास्तव असते. संस्कारी वाङ्मय ही देखील समाजाची सनातन गरज असते. ही सूत्रे गुरुजी वाङ्मयाच्या लोकप्रियतेत असावीत असेही वाटते.

प्रा. रा. ग. जाधव,

कॉन्टिनेन्टल प्रकाशनने प्रकाशित केलेल्या 'निवडक सानेगुरुजी'-प्रस्तावनेमधून



अनुक्रमणिका

सर्वांसाठी खुलं व्हावं यासाठी दहा दिवस प्राणांतिक उपोषण केलं. समाजात आढळून येणारी धार्मिक जडता आणि वैचारिक कृपणता त्यांच्या सामाजिक कवितेतून दिसून येते.

*'उद्योग सकलही गेले*
*बेकार सर्वही झाले*
*जगताती अर्धे मेले*
*श्रेयस्कर याहुन मरणें ॥*
*हे जीवन केविलवाणे ।*
*गाऊं मी कसलें गाणें ॥'*

(गाऊ मी कसले गाणें?)

भारतीय जनता पारतंत्र्यात रहात आहे. अन्न, वस्त्र, निवारा या मूलभूत गरजाही जिथे पूर्ण होत नाहीत. बेकारांची संख्या जिथे वाढते आहे, सोन्याचा धूर जिथे निघत होता तिथे सुतळीचा तोडाही मालकीचा नाही ही परिस्थिती पाहून सानेगुरुजींना आत्यंतिक क्लेश होत असत. त्या आंतरिक वेदना त्यांच्या कवितेतून बाहेर पडत. 'प्रेमाचे गाणे', 'प्रभू! भारतीचे वैभव कोठे गेले', 'गाऊ मी कसलें गाणें?', 'सुसंस्कृत कोण?', 'दिव्य मी स्वर्ग निर्मीन' यांसारख्या सामाजिक कविता तत्कालीन सामाजिक परिस्थितीवरील सानेगुरुजींचे भाष्य आहे. सानेगुरुजींनी सामाजिक बांधिलकी स्वीकारलेली असल्याने समाजाची अधोगती त्यांना पहावत नाही. ही परिस्थिती बदलणे समाजाच्या हातात आहे, म्हणून समाजाला संघटित केले पाहिजे, जुन्या-दुष्ट रुढी फेकून दिल्या पाहिजेत, निर्भयता, त्याग यांचे धडे समाजाला दिले पाहिजेत आणि त्यासाठी मुख्यत: समाजाने कृतिशील झाले पाहिजे.

*'भेदभाव मी जाळिन सारे*
*ऐक्याचे मी सोडिन वारे*
*दिव्यवळाच्या जयजयकारें*
*राष्ट्र उठवीन ॥*
*दिव्य मी स्वर्ग निर्मीन ।*

(दिव्य मी स्वर्ग निर्मीन)

सानेगुरुजींनी निर्माण केलेली धडपडणारी मुले ही त्यांच्या कृतिशीलतेची पावती होती. त्यांनी महाराष्ट्रभर सतत केलेले दौरे, तुरुंगात असताना इतर सहकारी मित्रांशी केलेला संवाद हा सामाजिक स्थित्यंतरासाठी धडपडणाऱ्या सानेगुरुजींचा होता.

सामाजिक कवितांमध्ये विविध सणांचे महात्म्य, ग्रंथांचे सामर्थ्य व थोरवी, मित्रप्रेम या विषयांची विविधता दिसते. नागपंचमी, दसरा, संक्रांत, गुढीपाडवा या सणांची माहिती वर्णन करताना सानेगुरुजींच्या मनात असलेल्या भारतीय संस्कृतीवद्दलचा अभिमानही जाणवतो.

*'उंच गुढी ही उभारली ।*
*चमके तेजे नभ:स्थळीं*
*सुंदर पट सुंदर माळा ।*
*गुढी सजविली सुमंगला (गुढीपाडवा)*

*ती संस्कृती उदात्त । अपुली शुभा अनंत*
*जणुं साठवीत एका । ऋषि नागपंचमीत*
*(नागपंचमी)*

## सानेगुरुजींची देशभक्तिपर कविता

सानेगुरुजींनी देव हाच देश आणि देश हाच देव मानला. जन्मदात्या मातेनंतर ते भारतमातेला मानतात. मातृभूमीच्या सेवेशिवाय परमेश्वराजवळ अन्य कोणतेही मागणे ते मागत नाहीत. सानेगुरुजींच्या कवितांचा कालखंड (१९२५-३५) आणि स्वातंत्र्य चळवळीचा कालखंड सारखा असल्याने त्या काळाचा प्रभाव त्यांच्या कवितांवर दिसतो. सानेगुरुजींवर गांधीजींचा



अनुक्रमणिका






## भावना !

*कला ही एक महत्त्वाचा मानवी व्यापार आहे. वाणी हे विचारांच्या देवघेवीचे साधन; त्याप्रमाणे कला हे भावनाप्रदानाचे साधन आहे. ती खरी कला की, जी भावना देते. ज्या कलाकृतीमुळे कोणत्याही प्रकारची - मग ती सत् असो वा असत् असो - भावना हृदयात उचंबळत नाही, ती कलाकृती खरी जिवंत कलाच नव्हे. ते कलेचे सोंग आहे. ती खोटी कला आहे. भावना देणारी ती कला, हे ठरले; परंतु येथेच आपण थांबलो तर धोका आहे. कला ज्या भावना देईल, त्या सत् असतील किंवा असत्‌ही असतील; सद्भावनावना देणारी ती सत्कला, असद्भावना देणारी ती असत्‌कला. असद्भावना दोन प्रकारच्या असतात. सद्भावनांचेही दोन प्रकार आहेत. असद्भावनांचा एक प्रकार म्हणजे ज्या भावना जोडण्याऐवजी तोडतात, आपले राष्ट्र चांगले, बाकीची वाईट, आपलाच धर्म चांगला, बाकीचे टाकाऊ अशा प्रकारच्या संकुचित भावना, द्वेष, मत्सर, कलहांना वाढवणाऱ्या भावना, भेदांची भूते प्रसवणाऱ्या भावना हा असद्भावनांचा एक प्रकार. दुसरा एक प्रकार म्हणजे रोजच्या जीवनातीलच साध्या प्रसंगाच्या भावना. या दोन्ही प्रकारच्या भावना सर्व मानवजातीस समजतात. त्यासाठी रामाचे वनात जाणे, सत्यासाठी हरिश्चंद्राने स्वत:ला विकून घेणे, भूतदयेसाठी शिबीराजाने मांडीचे मांस कापून देणे, प्राणिमात्राच्या प्रेमासाठी स्वत:च्या जीवनाचा होम करावयास उभे राहणारे भगवान् बुद्ध - हे सारे प्रसंग, या प्रसंगातील उदात्त भावना विश्वजनांस समजतात, आबाल स्त्रीपुरुषांस रडवितात. तसेच संसारातील मातेचे मुलांवरील प्रेम, मित्रांचे मित्रावरील प्रेम, एखाद्याचे मरण, एखादा गोड विनोद - या गोष्टीही सर्वांच्या हृदयाला समजतात. या दोन्ही प्रकारच्या भावना अखिल मानवी जातीला जोडतात. अशा भावना देणारी कला ती सत्कला. समाजात तिची पूजा झाली पाहिजे, तिला उत्तेजन दिले पाहिजे. कलावानांनी खऱ्या सत्कलेच्या सेवेला वाहून घेतले पाहिजे.*

*सानेगुरुजी — कला म्हणजे काय? प्रस्तावनेमधून*

प्रभाव होता. या प्रभावातून 'महात्माजींस' ही कविता लिहिली गेली. 'स्वातंत्र्यानंदाचे गाणे', 'स्वातंत्र्याचे आम्ही शिपायी', 'भारत-सेवा', 'झेंडागीत', 'स्वातंत्र्य-दिव्य-दर्शन', 'देशांसाठी मरू' या सारख्या देशभक्तिपर गीतांतून त्यांची दुसऱ्या मातेवरची, म्हणजेच भारतमातेवरची निष्ठा दिसून येते.

स्वातंत्र्यपूर्व काळातील परिस्थिती पाहून अस्वस्थ झालेले कविमन त्यांच्या देशभक्तिपर कवितांतून दिसते. भारताची वास्तव परिस्थिती, तिचे उज्ज्वल पूर्वरूप आणि भविष्यकाळातील तिचे उज्ज्वलरूप कसे असावे याचा विचार या कवितांमधून व्यक्त होतो. मातृभूमीवर नितांत प्रेम करणारे सानेगुरुजी मातृभूमी जखडली गेली म्हणून अस्वस्थ झालेले दिसतात पण त्यात केवळ कारुण्य नाही तर या कवितातून तडफ, स्फूर्ती



अनुक्रमणिका

आणि वीररस दिसून येतो. एका बाजूला अतिशय संवेदनशील आणि दुसऱ्या बाजूला ध्येयाने प्रेरित झालेले, स्वत:च्या प्राणाचीही पर्वा न करणारे सानेगुरुजी दिसतात. देशभक्तिपर कवितांतून आक्रोश नाही पण तरुणांची मने पेटविण्याचं, जागृत करण्याचं सामर्थ्य आहे ही कविता समूहाची कविता होती. महाराष्ट्रभर सानेगुरुजींनी जी चळवळ उभी केली त्यात ह्यातील काही कवितांचे गायन केले जाई. सानेगुरुजींची सगळ्यात गाजलेली आणि आजही गायली जाणारी कविता म्हणजे 'बल-सागर भारत होवो' ही होय.

*'या उठा करूं हो शर्थ*
*संपादुं दिव्य पुरुषार्थ*
*हे जीवन ना तरि व्यर्थ*
*भाग्यसूर्य तळपत राहो ।*
*बल सागर भारत होवो ॥*

भारत स्वतंत्र होण्यासाठी पराक्रमाची, तेजाची शर्थ करण्यासाठी प्राण समर्पण करण्यासाठी सिद्ध झालेल्या तरुणाची भावभावना व्यक्त करणारी ही कविता आहे. रामचंद्र कृष्ण लागू सानेगुरुजींच्या कवितेबद्दल लिहितात, 'सानेगुरुजींचे अंत:करण मृदू असले तरी त्यांच्यात कोणत्याही प्रकारचा दुबळेपणा नाही. दे ची हीनदीन स्थिती पाहिली म्हणजे त्यांच्या प्रतिभेला स्फुरण चढते. त्यांचे अंत:करण भरून येते. त्यांच्या सात्त्विक त्वेषाला, उत्साहाला, आवेगाला सीमा राहात नाही. आपल्या सर्वस्वाचा होम झाला तरी हरकत नाही, परंतु आपण आपल्या मायभूमीचे गतवैभव तिला प्राप्त करून देऊ अशी प्रतिज्ञा करतात. मार्दव, माधुर्य, लीनता या गुणांबरोबर कणखरपणा, जोम, ओज, तेज इत्यादी गुणांचा त्यांच्या काव्यात उत्कर्ष झालेला दिसून येईल.

सानेगुरुजींनी देशभक्तिपर राष्ट्रीय कविता लिहिली, पण कवी सावरकर आणि कवी गोविंद यांना जी 'राष्ट्रीय कवी' म्हणून लोकप्रियता मिळाली ती सानेगुरुजींना मिळाली नाही. सावरकर आणि कवी गोविंद यांच्यामागे त्यांची संघटना होती. काव्यविषयक त्यांची स्वत:ची भूमिका होती. सानेगुरुजींच्या काव्यात उत्स्फूर्तता अधिक होती, काव्याची बैठक नव्हती. कधी कधी ही उत्स्फूर्तता इतकी असे की कवितेत संयमाचा अभाव दिसून येई. सानेगुरुजींची देशभक्तिपर कविता ही समर्पणाचं तेज असलेली कविता आहे. ही कविता प्रेरक आहे पण भडक नाही, कृतिप्रवण आहे पण आक्रोशी नाही, स्वातंत्र्यासाठी लढणारी पण हिंसक नाही. भारतमातेला स्वातंत्र्य मिळवून देणं हे राष्ट्रकार्य आहे. या राष्ट्रकार्यासाठी आव्हान करणारी कविता सानेगुरुजींनी लिहिली.

भारतीय संस्कृतीबद्दल सानेगुरुजींना नितांत आदर होता. धर्माची अगदी साधी आणि सोपी संकल्पना 'खरा धर्म' या कवितेतून ते मांडतात.

*'खरा तो एकची धर्म ।*
*जगाला प्रेम अर्पावे ॥*
*जगीं जे हीन अति पतित*
*जगीं जे दीन पद-दलित*
*तयां जाऊन उठवावें ॥*
*जगाला प्रेम अर्पावे ॥'*

संतकवी ज्ञानेश्वरांनी जे वैश्विक मागणं पसायदानातून मागितलं ते सानेगुरुजींनी 'खरा धर्म' या कवितेतून मागितलं. अतिशय सेवालोभी, नि:स्वार्थी, जगत्कल्याणासाठी धडपडणारं सानेगुरुजींचं व्यक्तिमत्त्व यातून दिसतं. कारुण्य, बळ, जिव्हाळा यांची



अनुक्रमणिका







## *लेखणी तमाम जनतेची प्रतिनिधी होऊ दे !*

*समाजातील मूठभर सुखी लोकांचे अलस-लुलित संसार रंगवून लेखणीचे ललित कृतार्थ नका मानू. तुमची लेखणी तमाम जनतेची प्रतिनिधी होऊ दे. जनतेची बाजू घेऊन उठू दे. तुमच्या लेखणीच्या कर्तृत्वाला आज वाव आहे. मोठेमोठे विचार सभोवती घोंघावत आहेत. आणि समोर दु:खी, कष्टी अपार जनता आहे. भग्न असा विराट संसार आहे. तुमच्या मनोबुद्धी सानुकंप असतील, संवेदनाक्षम, संस्कारक्षम असतील तर वातावरणातील अदृश्य वारे तुम्हाला कळतील. तुम्ही का केवळ दृश्याचे उपासक आहात? दृश्याभोवती विचारांच्या नि भावनांच्या लाटा उसळत असतात. प्रत्येक वस्तूभोवती विचारांचे, भावनांचे वलय असते. ज्याप्रमाणे अणू विखंडून त्यातील अनेक शक्ती शास्त्रज्ञ मुक्त करतात, त्याप्रमाणे या संसाराभोवती जी विचार-वादळे घोंघावत असतात त्यांची शक्ती पकडून ती घरोघर नेऊन पोचवणे आणि तिच्या जोरावर क्रांती घडवून आणणे हे कार्य साहित्यिकांचे आहे. लोकांची मनोरचना बदलणे हे थोर कार्य आहे. खरीखुरी सुधारणा व्हायला हवी असेल तर क्रांती हवी असते. अंतर्बाह्य क्रांती ! मानसिक क्रांती ! मानसिक आणि सामाजिक. ती क्रांती घडवून आणून कायमच्या सुखाकडे मानव नेणे हा तुमचा थोर वारसा आहे.*

*सानेगुरुजी - निवडक सानेगुरुजी भा. ८ विचारसंपदामधून*

महानता ज्यात आहे अशा अश्रूंची मागणी ते परमेश्वराकडे करतात. 'बलसागर भारत होवो', 'अश्रू', 'रामवेडा', जीवनात सदा राम गुंफीन', 'खरा धर्म', 'जा रे पुढे व्हा रे पुढे' या कविता म्हणजे राष्ट्रीयता आणि मानवता यांचे एकत्रीकरण आहे.

मानवतेचे अधिष्ठान असलेली, सत्य-शिव-सौंदर्य यांची कास धरलेली, तीन मातृत्रयींचे अखंड स्तोत्र गायन करणारी, दुर्दम्य आशावाद असलेली, भक्तिरस आणि वीररसाचा आविष्कार करणारी कविता सानेगुरुजींनी लिहिली. कोणत्याही काव्यसंप्रदायाची बांधिलकी गुरुजींनी स्वीकारली नाही व त्यांच्या काव्याचा आदर्श ठेऊन कुठला संप्रदाय निर्माणही झाला नाही. कवी वसंत बापट, जे सानेगुरुजींच्या धडपडणाऱ्या मुलांपैकी, त्यांच्यावर सानेगुरुजींच्या काव्याचा प्रभाव होता. वसंत बापट यांनी राष्ट्र सेवा दलासाठी कविता लिहिल्या, त्यांची 'मानव तितुका' ही कविता सानेगुरुजींच्या 'खरा धर्म' या कवितेच्या जवळ जाणारी कविता आहे.

सानेगुरुजींच्या काव्याला काही मर्यादाही पडतात. कवितेतील विषयांमध्ये तोचतोचपणा आढळतो. काही कविता इतक्या दीर्घ आहेत की, त्यात संयम सांभाळला जात नाही. उदा. 'देवाजवळ', 'प्रेम कां करावे', 'हृदयाचे बोल' इत्यादी निसर्गकविता, प्रेमकविता हे या काव्याचे विषय होऊ शकत नाहीत. उत्कटता, हा काव्याचा गुण इथे मारक ठरल्यासारखा वाटतो. पाल्हाळ, निरसता आणि रचनेचा अगर प्रमाणशीरतेचा अभाव हे दोष दृष्टिआड करून चालणार नाहीत. सानेगुरुजींच्या कवितेत संस्कृत प्रहर्षिणी, वियोगिनी,

प्रमाणिका, अनुष्टुभ्, वसंततिलका ह्या वृत्तांचा सफाईदारपणे वापर केला आहे, त्यामुळे वृत्तवैचित्र्य दिसून येते.

**सत्याग्रही खंडकाव्य :**

सानेगुरुजींनी कवितेत-रचनेत फार प्रयोग केले असे म्हणता येणार नाही. जे अनुभवलं, जे लिहावसं वाटलं त्यातून लेखननिर्मिती झाली. 'सत्याग्रही' हे खंडकाव्य १९३० मध्ये त्रिचनापल्लीच्या तुरुंगात असताना लिहिले. हे खंडकाव्य तुरुंगात घडलेल्या सत्यघटनेवरील काव्य आहे.

सत्यनारायण हा श्रीमंत आईबापांचा एकुलता एक मुलगा होता. अठरा वर्षे वयाच्या या मुलाचे आठनऊ वर्षांच्या एका मुलीशी लग्न झालेले होते. तो सत्याग्रहात स्वयंसेवक होता. सत्याग्रही म्हणून त्याला पकडण्यात येतं. तुरुंगात तो अतिसाराने मरण पावतो. त्याच्या मृत्यूची तार आईवडिलांना मिळते. त्यांना जबरदस्त धक्का बसतो. तो रात्रीच्या वेळी दिव्य वेष धरून येतो आणि आई-बापाची समजून काढतो, असे या खंडकाव्याचे स्वरूप आहे.

'सत्याग्रही' हे चिंतनशील खंडकाव्य आहे. ह्या खंडकाव्याच्या निमित्ताने सानेगुरुजी सामाजिक प्रश्नांची मांडणी करतात. सानेगुरुजींच्या व्यक्तिमत्त्वामधील सामाजिक कळकळ, देशभक्ती, वैश्विक शांतता ही वैशिष्ट्ये यातही जाणवतात. या खंडकाव्यात हिंदू-मुस्लिम प्रश्न, स्पृश्य-अस्पृश्य भेदभाव, सर्वधर्म समन्वयाची कल्पना, भारताचे स्वातंत्र्य, सामाजिक बदल हे सर्व दिसून येते. गांधींबद्दल असलेला आदर हा सुद्धा प्रकर्षाने जाणवतो. वि. स. खांडेकरांच्या कादंबरीत जसा गांधींचा प्रभाव दिसतो तसं सानेगुरुजींची कविता, खंडकाव्य किंवा वैचारिक साहित्य पाहिलं तर हा प्रभाव जाणवतो. सानेगुरुजींनी एक खंडकाव्य लिहिलं. कवी यशवंत यांच्या खंडकाव्यांचा, आजही उल्लेख होत आहे, पण सानेगुरुजींच्या खंडकाव्याला लोकप्रियता मिळाली नाही. स्तोत्रांचे 'खानदेश स्तोत्र' त्यांनी लिहिलं होतं.

**स्त्री-जीवन - संग्राहक सानेगुरुजी :**

स्त्रियांनी स्वत:चे असे सुंदर अभिजात वाङ्मय निर्माण केले. कहाण्या, उखाणे, गाणी, ओव्या ह्या स्त्री वाङ्मयाचा सानेगुरुजींवर लहापणापासून जबरदस्त पगडा होता. स्त्रियांनी स्वत:चा आत्मा संपूर्णपणे ओतून निर्माण केलेल्या त्या ओव्या होत्या. अतिशय अकृत्रिम, सहृदय, विनोदी, सूचक अशा या ओव्या ऐकताना सानेगुरुजी भारावून जात. या ओव्या महाराष्ट्रातील संस्कृतीचे चित्रण करतात, त्या लोकसंस्कृती, मौखिक वाङ्मय टिकवायचा प्रयत्न करतात; तेव्हा आपणही हे अमर वाङ्मय जपलं पाहिजे असं सानेगुरुजींना वाटू लागले. 'मराठी साहित्याचा फकीर' हे ध्येय त्यांच्या मनात येई. संतकवी मुक्तेश्वरांनी 'एकेक अक्षराची भीक' मागून अमर वाङ्मय निर्माण केले, तर अस्तित्त्वात असलेले अमर वाङ्मय नष्ट होऊ लागले आहे ते आपण का जतन करू नये? या भूमिकेतून त्यांनी ओवी संग्रह सुरू केला. बडोदा, अलिबाग, पुणे, कोकण, अंमळनेर या ठिकाणाहून त्यांनी एकूण अडीच हजार ओव्या गोळा केल्या. भाऊ-बहीण, माय-लेकरे, मुलगी, संसारातील सुखदु:खे हे चार भाग केले. प्रत्येक भागाला रसपरिचय जोडून लिहिल्याने कवी सानेगुरुजी यातून दिसतात.

ओव्यांचे एकत्रीकरण करणे हे परिश्रमाचे










## *शब्द म्हणजे पेरणी !*

*आजपर्यंत जगाला वाङ्मयानेच वाढवले, वळण दिले, आनंद दिला, माणुसकी दिली. वाङ्मयानेच सहृदयता, उदारता, बंधुता, पुरुषार्थ, पावित्र्य, प्रेम, न्याय ही दिली आहेत. भारतीयांची मनोरचना पाहा. विचार, आचार पाहा. कोणी त्यांना रंगरूप दिले? रामायणाने, महाभारताने, कबीराच्या दोह्यांनी, तुलसी-रामायणाने, गोपीचंदाच्या गीतांनी, मीराबाईच्या मधुर भजनांनी, ज्ञानेशांच्या ओवीने, तुकोबांच्या अभंगांनी, वामनी श्लोकांनी, मोरोपंती आर्यांनी, रामदासांच्या वाणीने, शाहिरांच्या रसवंतीने, बायकांच्या कहाण्यांनी - अशा सर्व वाङ्मयाने भारतीय जीवनाला रंग दिला आहे. प्राचीनांनी त्यांच्या कालानुसार ध्येये दिली, विचार दिले, आजच्या युगधर्माला अनुरूप अशी गाणी, गोष्टी, विचार तुम्ही द्या. तुमची जबाबदारी मोठी आहे. तुम्ही जी गीते लिहाल, ज्या गोष्टी रचाल, जी नाटके लिहाल, निबंध लिहाल, त्यातून जनतेच्या मनोबुद्धीला वळण मिळेल. लिहिलेला वा बोललेला प्रत्येक शब्द म्हणजे पेरणी आहे. वेडेवाकडे लिहू नका. तुमचा होईल खेळ; राष्ट्राचा जाईल प्राण. म्हणून सादीने म्हटले आहे : 'पांढऱ्यावर काळे करण्यापूर्वी शंभरदा विचार करा.' अमृत नसेल देता येत, दूध द्या. तेही न जमले तर निर्मळ जीवन द्या. परंतु दारू नको. जीवनात विनोद, हास्य यांना महत्त्वाचे स्थान आहे. परंतु साऱ्या जीवनाचे हसे नका करू. इंदूबिंदूच्या कुरुपतेतून निर्माण होणारा विनोद नको. खेडवळांची भाषा नाटकात वापरून त्यांच्या भाषेची थट्टा करणारा विनोद नको.*

*सानेगुरुजी - निवडक सानेगुरुजी भा. ८ विचारसंपदामधून*

काम सानेगुरुजींनी अतिशय मन:पूर्वक केले. त्यांच्या या परिश्रमामुळे हे वाङ्मय आजच्या पिढीपर्यंत उपलब्ध झाले. ओव्यांमध्ये असलेले काव्य, जिवंतपणा, रसाविष्कार, सौंदर्य, लय, नाद, ओवी हा वाङ्मयप्रकार, त्याची सहजता, त्यातील कलाविष्कार या साऱ्याला जोड मिळाली ती सानेगुरुजींच्या कारागिरीची मिळाली. स्त्रीजीवन भाग एक व दोन म्हणजे कला आणि कारागिरी यांचा उत्तम मेळ आहे.

ज्यांला स्त्रियांच्या मनोविश्वाबद्दल कुतूहल आहे, त्यांची सुख-दु:खं, भावना, अन्याय जाणून घ्यायचा आहे त्यासाठी ओवी वाङ्मयाला पर्याय नाही. सानेगुरुजींना असलेली स्त्रियांच्या मानसिकतेबद्दलची ओढ आणि अमर वाङ्मय जपलं पाहिजे याबद्दलची तळमळ यातून हे संकलन झालं असलं पाहिजे. संकलनात एका ओवीतून दुसरी ओवी निर्माण झाली असं वाटावं इतकी सहजता आहे. स्त्रियांचे लोकमानस, तत्कालीन समाजजीवन, विविध स्थलदर्शन, सणमहात्म्य, व्यक्तिसंबंध यांसारख्या विविध विषयांचे दर्शनही या ओव्यांमधून होते. सानेगुरुजींनी ओवी वाङ्मय पुस्तक रूपाने आणून मौखिक वाङ्मय लिखित वाङ्मयात बंदिस्त करण्याचं मोलाचं काम केलं आहे.

### नाटककार सानेगुरुजी

सानेगुरुजी 'पत्री' कवितासंग्रह प्रकाशित

होऊनही ते कवी म्हणून मान्यता पावले नाहीत. तसेच पाच नाटके लिहूनही नाटककार सानेगुरुजी असे म्हणता येणार नाही. सानेगुरुजींनी लिहिलेली नाटकं की नाटिका हा प्रश्न प्रथम येतो. त्यांच्या नाटक लेखनाचा कालखंड हा इ. स. १९३९ ते इ. स. १९४९ म्हणजे स्वातंत्र्यपूर्व आणि स्वातंत्र्योत्तर असा दहा वर्षांचा कालखंड आहे. सानेगुरुजींचा मुळातला पिंड हा सामाजिक कार्यकर्त्यांचा असल्याने त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे पडसाद या नाटकातून दिसतात. त्यांना अभिप्रेत असलेलं स्वातंत्र्य आणि स्वातंत्र्य मिळूनही वाट्याला आलेलं मानसिक पारतंत्र्य यांचं चित्रीकरण त्यांच्या नाटकात दिसतं. स्पृश्यास्पृश्य, हिंदू-मुस्लिम ऐक्य, सत्याग्रह, श्रमदान, गांधीजी, स्वातंत्र्य या विषयाबद्दल ते जे वारंवार बोलत, स्फुट लेखन करीत, काव्याविषयही त्यांनी जे निवडले होते त्यांचाच विस्तार त्यांनी नाटकात केला. त्यामुळे नाट्यसंपदा वैशिष्ट्यपूर्ण झाली नाही. नाटकांची संख्या अगदी मर्यादित म्हणजे फक्त पाच असल्याने विपुलही झाली नाही. नाटकामध्ये रंगभूमीचा विचार प्राधान्याने करावा लागतो. सानेगुरुजींनी रंगभूमीपेक्षा सामाजिक समस्या मांडण्याचे साधन म्हणून या माध्यमाकडे पाहिले. आपल्या लेखनामागची भूमिका स्पष्ट करताना ते म्हणतात, 'पक्षी किलबिल करतात, कारण त्यांना किलबिल केल्याशिवाय रहावत नाही म्हणून. कोणाला त्याची कटकट वाटते, कोणी त्याचे कौतुक करतात. मी लिहितो कारण मलाही लिहिल्याशिवाय राहवत नाही.'

सानेगुरुजींनी 'ते आपले घर' (१९३९) 'निळा पक्षी', '(ब्लू बर्ड' या इंग्रजी नाटकाचा केलेला अनुवाद) 'सोन्यामारुती' अर्थात समाजदृश्ये (१९४४), अस्पृश्योद्धार (१९४७), 'नवमंगलप्रभात' (७ मे १९४९ ते २८ मे १९४९) या नाटिका लिहिल्या. 'ते आपले घर' या नाटकातून दीनदलितांचे, अस्पृश्यांचे दु:ख मांडतात. सामाजिक समतेची कल्पना पात्रांच्या द्वारे सांगतात. 'नवमंगलप्रभात' यात स्वराज्य आले पण ते गोरगरीबांचे कुठे झाले? शेतकऱ्यांची सावकाराकडून होणारी पिळवणूक कुठे थांबली? मानसिक गुलामगिरी नष्ट होणार नसेल तर स्वराज्याचा खरा अर्थ समजला असे म्हणता येत नाही. 'सोन्यामारुती'त समाज जीवनातील भ्रष्टाचार, रूढी आणि परंपरा यांनी जखडलेले समाजजीवन रंगविले. 'निळा पक्षी' म्हणजे सुख. ते जितके शोधावे तितके दूर जाते. सुख हे मानवसापेक्ष असते हे तत्त्व या नाटकातून सांगितले. 'अस्पृश्योद्धार' मध्ये नारायण हा ब्राह्मण मुलगा महारांमध्ये काम करतो. प्रथम वडिलांना पटत नाही, नंतर त्यांचेही मतपरिवर्तन होते. या नाटकातील नारायण म्हणजे परिवर्तनवादाचा विचार मांडणारे सानेगुरुजी होत. गुरुजींची समाजवादी विचारसरणी त्यांच्या सर्व लेखनातून जाणवते. 'बलसागर भारत होवो' लिहिणारे कवी सानेगुरुजी असोत, 'भारतीय संस्कृती' लिहिणारे वैचारिक सानेगुरुजी असोत, पंढरपूरचे विठ्ठल मंदिर सर्वांसाठी खुले करावं यासाठी दहा दिवस उपोषण करणारे सामाजिक कार्यकर्ते सानेगुरुजी असोत त्यांचा मूळ गाभा, मूळ वैचारिक बैठक सुटत नाही असे दिसते.

सानेगुरुजींच्या कवितेत जशी प्रेमभावना, कल्पनारम्यता नाही तशी नाटकातही नाही. अत्यंत तळमळीने ही नाटके लिहिताना समस्या

मांडणे हा प्रधान हेतू होता. अतीव संवेदनशीलता किंवा भाबडेपणा कसा साहित्याला मारक ठरतो तो इथे दिसून येतो. सत्य, शिव, सौंदर्याची त्यांना जी ओढ होती, आदर्श भारत ही स्वप्नातील कल्पना वास्तवात आणण्याची तळमळ होती, जो सच्चेपणा होता तो मात्र दुर्लक्षून चालणार नाही. समाजातील प्रत्येक सजीवाशी बांधलेलं अदृश्य नातं त्यांच्या साहित्यातून दिसतं तसं नाटकातूनही दिसतं.

'ते आपले घर' किंवा 'अस्पृश्योद्धार' यातून त्यांनी गीतेही लिहिली. 'अस्पृश्योद्धार' मध्ये राघू हा वालवीर पुढील गीत म्हणतो.

*'धर्मवीर हो चला । झुंज आज लागलें ।*
*धर्मबंधूंसाठी या । देऊं आपुले गळे ॥*
*गर्जना करा उठा । त्याग थोर या करूं*
*मोह सर्व सोडुनी । संकटास आदरूं ॥*

जाती-धर्मनिरपेक्ष तत्त्वावर आधारित युवकांची संघटना हवी या गुरुजींच्या आग्रहातून 'राष्ट्र सेवा दलाची स्थापना १९४२ च्या आंदोलनकाळात झाली होती. या दलातून युवकांसाठी शैक्षणिक शिबिरे घेतली जात. युवकांना स्वातंत्र्यासाठी प्रेरित करताना वेगवेगळ्या गीतांचा वापर केला जाई. ती गाणी किंवा त्या आशयाच्या कविता सानेगुरुजींच्या या नाटकातून दिसतात. नाटक या साहित्यप्रकाराचे गुण किंवा वैशिष्ट्ये सानेगुरुजींच्या नाटकाला लावायचे ठरवले तर नाटककार सानेगुरुजी अपयशी ठरतात. अतिशय लहान, लहान अशी पाच नाटकं, (त्यातीलही एक अनुवादित) लिहून सानेगुरुजींनी मनातील लेखनाची खळवळ दूर केली. नाटककाराचा अभिनिवेश न धरता लिहिलेली ही नाटके रंगभूमीसाठी नव्हती आणि म्हणून रंगभूमीवर सादरही झाली नाहीत. सानेगुरुजींनी नाटक हा साहित्य प्रकार हाताळता एवढेच याचे मूल्य आहे.

**सानेगुरुजींचे वैचारिक साहित्य**

निबंध, चरित्र वाङ्मय, भाषणसंग्रह, पत्रलेखन, अनुवादित साहित्य, स्फुट लेखन, भारतीय संस्कृती इत्यादी विपुल साहित्य निर्मिती-वैचारिक साहित्य म्हणून पहाता येते.

'मूळ बैठक भावनाप्रधान पण त्या बरोबर ज्ञानाच्या खाणीतले सुवर्णकण वेचावेत आणि सर्वसामान्यांना द्यावेत ही तळमळ. ज्ञानपिपासू विद्यार्थी, समाजातील अज्ञान पाहून विव्हळ होणारा सुधारक आणि उच्च जीवनमूल्ये ही केवळ विचारासाठी नसून आचाराकरिता असतात अशी श्रद्धा बाळगणारा संत यांचे विलक्षण मिश्रण त्यांच्या व्यक्तिमत्त्वात. तेच प्रतिबिंब कथा, कादंबऱ्यांप्रमाणे निबंधात.''

— वि. स. खांडेकर

निबंध लेखनात सानेगुरुजींच्या पुढे आदर्श होता तो विष्णूशास्त्री चिपळूणकरांचा होता. चिपळूणकरांच्या स्वदेश, स्वधर्म आणि स्वभाषा ह्या त्रयींचा त्यांच्या निबंधावर प्रभाव होता. ना. सी. फडके, वि. स. खांडेकर, ना. मा. संत, म. ना. अदवंत या निबंध लेखकांपेक्षा सानेगुरुजींची प्रवृत्ती निराळी होती. निबंध हे लालित्यपूर्ण असण्यापेक्षा विचारप्रवण असावेत अशी भूमिका या निबंधामागे दिसते. 'छात्रालय', 'कर्तव्य', 'साधना', 'विद्यार्थी' यांसारख्या नियतकालिकातून त्यांनी वेळोवेळी लेखन केले. 'क्रांतीच्या मार्गावर' ही प्रचार पुस्तिका लिहिली.

*'मुले म्हणजे देव, मुले म्हणजे देव,*

*मुले म्हणजे राष्ट्राची अमोल ठेव ॥*
*भविष्याचे कोमल मोड*
*भविष्याच्या कळ्या गोड*
*भविष्याचे विधाते हे*
*भक्तिभावे सेव ।*

(धडपडणारी मुले)

या मुलांसाठी — त्यात कुमार गटासाठी, किशोर गटासाठी निबंध लिहिले. मुलांना घडविणे ही तळमळ या निबंध वाङ्मयात दिसून येते. सानेगुरुजींच्या निबंध वाङ्मयाचे दोन भाग करता येतात - एक स्वतंत्र निबंध लेखन आणि दुसरे अनुवादित निबंध लेखन. जे चांगलं त्यांच्या वाचनात आलं आणि ते इतर भाषेतील असलं की गुरुजी तात्काळ त्याचा अनुवाद करीत. सानेगुरुजींनी 'गोड निबंध' लिहिले. या निबंधाचे विषय म्हणजे थोर पुरुषांची, धर्मप्रवर्तकांची, शास्त्रज्ञांची ओळख, निसर्ग वर्णने, मराठी साहित्य संमेलनाची उपयुक्तता, शेतकरी-मजूर-कामगारांच्या समस्या, खादी वापराचा आग्रह, गांधी टोपी, हरिजनांसंबंधी प्रश्नोत्तरे, देवा गणेशा यांसारखे होते. स्वातंत्र्योत्तर काळात अकरा निबंध एकत्रित केले गेले त्यात स्वातंत्र्याचा अर्थ, समाजवाद हा एकच मार्ग, आंतरभारती, संतांचा मानव धर्म, राष्ट्रीय चारित्र्य, स्वप्न आणि सत्य या विषयांवर खंडनमंडन केले गेले. एकूण या निबंध विषयातील वैविध्य चटकन लक्षात येते. तत्कालीन सामाजिक, राजकीय परिस्थितीचा आलेख या निबंधांतून दिसून येतो. निबंधाची भाषा अतिशय साधी, सोपी पण वाचकांशी थेट संवाद साधणारी होती. ज्या मुलांसाठी त्यांनी निबंध लेखनाचा प्रपंच मांडला त्या मुलांना संस्कारित करण्याचा हेतू या निबंधांमुळे साधला गेला. या निबंधांत पांडित्य प्रदर्शन नाही किंवा स्वतःच्या आग्रही मतांचा अभिनिवेशही नाही.

सर्वधर्मसमन्वय भावना, राष्ट्रीय एकात्मता आणि बंधुभाव निर्माण करण्याच्या प्रयत्नाचा एक भाग म्हणून 'सुंदर पत्रे' लिहिली गेली. आपल्या पुतणीला सुधाला त्यांनी जी पत्रे लिहिली, ती म्हणजे सुधाचे निमित्त करून गुरुजींनी महाराष्ट्रातील बालकुमारांशी साधलेला सुखसंवादच आहे. सुंदर पत्रांतून सहज जाता जाता एखादा विचार मांडतात, थोरा-मोठ्यांच्या जीवनातील प्रसंग वर्णन करतात, कधी गंभीर तर कधी विनोदीही करतात. भारतीय संस्कृतीबद्दल गुरुजींना नितांत आदर होता. सुधेला ते या संस्कृतीबद्दल लिहितात, 'संस्कृती म्हणजे जीवनाला जे जे उजाळा देते, सुंदरता देते, समृद्ध करते, पुढे नेते ते ते संस्कृतीच होय. संस्कृती म्हणजे संयम. मानवाला सुसंस्कृत व्हायचे असेल तर मानवाने संयम राखला पाहिजे. मी मोठा, माझा धर्म मोठा, माझी जात, प्रांत, राष्ट्र मोठे, माझे तेवढे चांगले बाकीचे त्याज्य असे म्हणणाऱ्याला संस्कृती कळली नाही. संस्कृती जगातील जे जे चांगलं आहे ते स्वीकारील, सहकार करेल; संगम करेल. असे न मानणारी ती संस्कृती नसून विकृती आहे. 'स्वतंत्र बुद्धीची तेजस्वी मुलगी हो' असं ते केवळ सुधेला म्हणत नाहीत तर प्रत्येक भारतीय मुलीसाठी ही तळमळ आहे. स्त्री शिक्षणाविषयी गुरुजी लिहितात, स्त्रीने शिकावे कारण स्वतःच्या विकासासाठी शिकायचे. देहाला भाकरी हवी तशी मनाला विचाराची भाकर हवी. स्त्रियांची मनोबुद्धी का उपाशी ठेवायची? सर्वसामान्य माणसाला



अनुक्रमणिका






मृत्यूची भीती वाटते. गुरुजी या मरणाचे वर्णन अगदी सहज करतात. 'मरण म्हणजे मोठी झोप तर रोजची झोप म्हणजे छोटे मरण. झोप म्हणजे अमृत. नवजीवनदायी अमृतांजन. म्हणून जीवनही सुंदर आणि मरणही सुंदर.'

श्यामच्या पत्रांतूनही विविध विषयांचा प्रपंच दिसतो. 'काँग्रेस आणि गांधीजी', 'सेवादल संघटना', 'झेंडा म्हणजे राष्ट्राचा गौरव', 'गांधीवाद', 'कला आणि जीवन', 'सण-उत्सव' हे सारे सामाजिक विषय त्यांनी प्रौढ युवकांसमोर ठेवले. या पत्रांतून मानवतेचा धर्म शिकविला. रामदासांची 'शहाणे करून सोडावे सकळजन' ही उक्ती गुरुजींनी लेखनातून सातत्याने अंगीकारली. ही पत्रे वाचत असताना नेहरूंनी इंदिरा गांधींना लिहिलेल्या पत्रांची आठवण होते. पत्राची भाषा साधी, सुंदर, रसाळ तितकीच जिवंत आहे. विषयाचे वैविध्य आणि गुरुजींच्या व्यक्तिमत्त्वाचा आविष्कार झाल्याने या पत्रांना आजही महत्त्व आहे. पत्रातील विषय (काही अपवाद सोडता) तत्कालिक असले तरी त्यातील विचार पुढील शतकासाठी मार्गदर्शक होईल इतका महत्त्वाचा आहे.

विविध क्षेत्रांत काम करणाऱ्या तेवीस थोर व्यक्तींची चरित्रे 'हिमालयाची शिखरे' या पुस्तकात आहेत. समाजाला समृद्ध आणि समर्थ करण्यासाठी चरित्र वाङ्मयाची आवश्यकता आहे असे गुरुजींना वाटे, या ऊर्मीतून त्यांनी चरित्र लेखन केले. जे जे उदात्त, मंगल, पवित्र असेल ते ते समाजासमोर वाणी आणि लेखणी यांच्या माध्यमातून सतत मांडायचं हा ध्यास त्यांनी घेतला होता. विवेकानंद, टिळक, भाऊराव पाटील, राजा अशोक, गटे, अब्राहम लिंकन, पैंगबर इत्यादी विविध क्षेत्रातील मान्यवर व्यक्ती त्यांच्यासमोरील आदर्श होते. पुढील पिढीला त्यांचे कार्यकर्तृत्व समजले पाहिजे म्हणून गुरुजींनी चरित्रलेखन केले. नामदार गोखले यांचे चरित्र पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन भागात लिहिले. नामदार गोखल्यांचे जीवनचरित्र मांडणारे तोपर्यंत एकही चरित्र उपलब्ध नव्हते. ती उणीव सानेगुरुजींच्या चरित्राने पुरी केली. इतिहासाचार्य राजवाडे यांची इतिहास संशोधक म्हणून योग्यता आणि व्यासंगी वृत्ती त्यांच्या इतिहासाचार्य राजवाडे या चरित्रामुळे समजली. बंगालमधील नामवंत समाजसेवक ईश्वरचंद्र विद्यासागर यांचेही चरित्र गुरुजींनी लिहिले. महर्षी धोंडो केशव कर्वे प्रस्तावनेत लिहितात, 'सद्‌गुणांची वाढ करणे हे शिक्षणाचे ध्येय असले पाहिजे. या दृष्टीने विचार केला असता अशी चरित्रे ही उत्तम शिक्षक होत. रा. साने हे शालागृहातच मुलींना पढवून समाधान मानणारे शिक्षक नसून मुलांच्या मनावर सद्वर्तनाचा ठसा कायमचा उमटावा म्हणून त्यांचा हा प्रयत्न आहे.'

चरित्रलेखन करण्यासाठी संदर्भांची जुळवाजुळव करणे हे फार परिश्रमाचे काम असते. सानेगुरुजींनी हे परिश्रम मनापासून केले. भोवतालचा समाज ज्ञानसंपन्न, कलासंपन्न, ध्येयवादी, आदर्शाची ओढ वाटणारा निर्माण करायचा असेल तर अशी चरित्रे वाचनात आली पाहिजेत, मुलांसमोर ठेवली पाहिजेत या तळमळीने त्यांनी चरित्रे लिहिली. सानेगुरुजींनी लिहिलेले महात्मा गांधींचे चरित्र म्हणजे त्यांच्या चरित्र वाङ्मयाचा मुकुटमणी आहे 'बापूजींच्या गोड गोष्टी' चे सहा भाग असंख्यवेळा पुनर्मुद्रण झाले. खास मुलांसाठी सोप्या भाषेत लिहिलेले हे चरित्र

अनन्यसाधारण आहे.

गुरुजींनी चरित्र लेखन केले ते थोर देशभक्तांचे, धर्मप्रवर्तकांचे, तत्त्वज्ञांचे, शास्त्रज्ञांचे. मानव्याच्या प्रस्थापनेसाठी, जनकल्याणासाठी, सर्वस्वाचा होम करणाऱ्या पराक्रमाच्या आविष्कारापुढे गुरुजी नतमस्तक होतात. आणि असाच चरित्रनायक निवडतात. 'भगवान श्रीकृष्ण' सारखे परमेश्वराचे चरित्र लिहून त्याला माणसांमध्ये वसविले. संस्कारांनी माणूस घडतो. मुलांच्या संस्कारक्षम वयात त्यांच्या समोर अशी चरित्र हवीत. या तळमळीतून त्यांनी ह्या चरित्र वाङ्मयाचा लेखन प्रपंच केला.

'जगात जे जे सुविचार वारे मदीय भाषेत भरोत सारे' या भूमिकेतून गुरुजी अनुवादित साहित्याकडे वळले. केवळ इंग्रजी साहित्याचा अनुवाद करायचा ही पारंपारिक चौकट त्यांनी मोडली. जे जे चांगले, उदात्त, मानवतेला पोषक असे साहित्य कुठल्याही भाषेतील असो ते वाचनात आले की ते मराठी वाचकांना दिल्याशिवाय ते स्वस्थ बसत नसत. गुरुजींचे विचारप्रवर्तक अनुवादित म्हणजे टॉलस्टॉयच्या "What is art' या पुस्तकाचे अनुवादरूप- 'कला म्हणजे काय?' या पुस्तकाच्या प्रस्तावनेत त्यांनी महाराष्ट्रातील कलाक्षेत्रातील परिस्थितीचा आढावा घेतला. 'रागिणी', 'दौलत' या कादंबऱ्यांवर टीका केली. या अनुवादामुळे 'कलेसाठी कला' की 'जीवनासाठी कला' या वरून वाद झाला.

भगिनी निवेदिता यांच्या दोन पुस्तकांचे 'राष्ट्रीय हिंदूधर्म' व 'समाजधर्म' या नावाने अनुवाद केले. रवींद्रनाथ टागोर यांच्या पुस्तकाचा 'साधना' या नावाने अनुवाद केला. 'Kalki or The Future of Civilisation' या ग्रंथाचा साने गुरुजींनी 'संस्कृतीचे भवितव्य' या नावाने अनुवाद केला. अवतीभवतीचे सामाजिक जीवन आणि समाजातील नैतिक मूल्यांची घसरण यावद्दल राधाकृष्णन जसे चिंतनशील होते तसेच सानेगुरुजीही होते. गांधीजींनी प्रार्थनासभेत जी प्रवचने केली ती 'दिल्ली डायरी' या नावाने गुरुजींनी अनुवादित केली. 'कुरल' हा तमीळ ग्रंथाचा अनुवाद, डॉ. हेन्री थॉमस यांच्या The story of human race' या पुस्तकाचा अनुवाद 'मानव जातीची कथा', कृष्णा हाथिसिंग यांच्या With No Regrets या पुस्तकाचा अनुवाद 'ना खेद ना खंत' अशा विविध वैचारिक आणि सांस्कृतिक स्वरूपाचे साहित्य त्यांनी अनुवादले. अनुवादकाच्या व्यक्तिमत्त्वाचे, त्याच्या वैचारिक मतांचे साधर्म्य जर मूळ कलाकृतीशी जुळणारे असतील तर तो अनुवाद अधिक चांगला होतो. त्याप्रमाणे सानेगुरुजींचा पिंड वैचारिक, चिंतनशील असल्याने या अनुवादित साहित्याने मराठी साहित्यात मोलाची भर पडली.

**भारतीय संस्कृती : अर्थगर्भ वैचारिक मंथन**

१९३७ मध्ये 'भारतीय संस्कृती' हे पुस्तक प्रसिद्ध झाले. भारतीय संस्कृतीवर नितांत प्रेम करणारे सानेगुरुजी म्हणतात, 'भारतीय संस्कृतीवर ज्ञानाने लिहिण्याचा अधिकार मला नाही पण प्रेमाने लिहिण्याचा आहे.' अद्वैताचे अधिष्ठान, वर्ण, कर्म, भक्ती, ज्ञान, मूर्तिपूजा यांसारख्या कितीतरी कठीण वाटणाऱ्या संकल्पना सानेगुरुजी अगदी सोप्या, सहज, ओघवत्या भाषेत स्पष्ट करून सांगतात. उदाहरणांचा वापर तर इतका चपखल आहे की ज्ञानेश्वरांनी लोकांना पटवून देताना ज्ञानेश्वरीत जशा वेगवेगळ्या उदाहरणांचा वापर



अनुक्रमणिका






केला त्याची आठवण व्हावी.

'अद्वैत म्हणजे माझ्यासारखाच दुसरा. द्वैत म्हणजे अज्ञान, रुढी, भेदभाव, दैन्य इत्यादी', 'बुद्धीचा विकास म्हणजे धर्म', 'शरीर, हृदय आणि बुद्धी या तिन्हीच्या संयमाने करायचे ते कर्म', 'बलोपासनेशिवाय उद्दिष्टपूर्ती नाही.' 'मनुष्य म्हणजे बुद्धीमान वाघ', चराचरावर प्रेम करू पाहणारी, कृतज्ञता सर्वत्र प्रकट करणारी ही भारतीय संस्कृती' अशा अतिशय सोप्या भाषेत ते कठीण अर्थ उलगडून समोर ठेवतात.

भारतीय संस्कृतीतील निरनिराळ्या प्रतीकांमध्ये दडलेला अर्थ गुरुजी सहजपणे उलगडून दाखवितात. कर्म, ज्ञान, भक्ती हे भारतीय 'संस्कृतीचे तीन पदर आणि यांची गाठ पडणे म्हणजे ब्रह्मगाठ. दक्षिणा देताना ओली का करायची? हृदयातल्या ओलाव्याचा या दानाला स्पर्श व्हावा म्हणून. रांगोळीत स्वस्तिक का? तर स्वस्तिक याचा अर्थ सर्वांचे शुभ, कल्याण होवो. मौजीबंधन याचा अर्थ संयमाने राहून ज्ञानार्जनावर लक्ष केंद्रित करणे. विवाहानंतर अंतरपाट दूर करणे याचा अर्थ वधूवरात आता अंतर नको. उभयतांचे जीवन एकरून होऊ दे. भारतीय संस्कृती ही भारतवर्ष जोपर्यंत असेल तोपर्यंत जिवंत आहे असा त्यांचा ठाम विश्वास होता.

भारतीय संस्कृती ही अंधश्रद्धेवर नाही तर विचारावर अधिष्ठित आहे. जिथे जिथे संशोधन आहे, ज्ञान आहे. त्या त्या ठिकाणी ही संस्कृती उभी आहे. संशोधकांचा सन्मान करणारी ही संस्कृती न्यूटन, कार्लमार्क्स, डार्विन यांना ऋषितुल्य मानते. परंपरा आणि आधुनिकता यांचा संगम या संस्कृतीत आहे. ज्ञानावर, अनुभवावर आधारलेल्या या संस्कृतीला कशाचेही भय नाही असे सानेगुरुजी आत्मविश्वासपूर्वक सांगतात.

मानवजातीचं कल्याण हा अंतिम धर्म आहे. अद्वैताचा साक्षात्कार प्रत्यक्षात आणायचा असेल तर जातीची, धर्माची डबकी दूर केली पाहिजेत. माणसाला माणूस म्हणून जगवा हेच अद्वैताचे साक्षात्कारी रूप आहे. त्यातच भारताची प्रगती आहे. स्त्रीची अफाट सहनशीलता त्यांना भावते. स्त्री जे उपास-तापास करते त्या जोडीने तिने खादी, ग्रामोद्योग, सेवाव्रतही केले पाहिजे. आंतरजातीय विवाह केल्याशिवाय भारतात सर्वगामी नवचैतन्य येणार नाही. याकरिता मुलामुलींनी बंड केले पाहिजे. घटना कागदावर नको हृदयात हवी. भारतीय संस्कृतीचं मूल्यमापन करत असताना अवतीभवतीच्या सामाजिक आणि राजकीय परिस्थितीवर ते मार्मिक भाष्य करतात.

भारतीय संस्कृती ही ज्ञानमय, संग्राहक, कर्ममय आहे. ही संस्कृती सर्वांना सामावून घेईल. नवीन प्रयोग, अविरत उद्योग करेल. भारतीय संस्कृती म्हणजे सर्वांगीण विकास. भारतीय संस्कृतीच्या उपासकांची महान यात्रा अनादिकालापासून सुरू आहे. व्यास-वाल्मिकी, बुद्ध-महावीर, शंकराचार्य-रामानुज, ज्ञानेश्वर-तुकाराम, नानक-कबीर वगैरे मोठमोठ्या संतांनी ही यात्रा चालविली आहे. या यात्रेचे पुढील विभूती हे गांधी-नेहरू, योगी अरविंद होते. भारतीय संस्कृती सत्पुत्रांना हाक मारते. विसाव्या शतकातील इंदिरा गांधी, मदर तेरेसा, बाबा आमटे, जयंत नारळीकर, अमर्त्य सेन, पंडित रवीशंकर कितीतरी विभूतींनी ही संस्कृतीची पताका पुढे चालू ठेवली. हे सर्व भारतीय संस्कृतीचे

उपासक आहेत. यापुढेही असे उपासक निर्माण होतील. भारतीय संस्कृती चिरंतन राहिल.

**सानेगुरुजींच्या साहित्याचे वर्तमानातील मूल्य :**

११ जून १९५० या दिवशी गुरुजी इहलोक सोडून परलोकात गेले. जवळजवळ पन्नास वर्षांनी पुन्हा त्यांच्या साहित्याचे मूल्यमापन केले तर आजही सामाजिक परिस्थिती फारशी बदलली नाही, उलट अधिक अधोगतीला गेली आहे असे जाणवते. आजच्या पिढीला संस्कारित करण्यासाठी पुन्हा 'श्यामची आई' वाचायला हवं. शाळेतून नैतिक मूल्य शिकवली जातात, ती नैतिक मूल्य सानेगुरुजींच्या साहित्यात दिसतात. सानेगुरुजींनी केलेली जातिधर्मनिरपेक्ष राष्ट्र आणि सामाजिक समता, समाजवाद, राष्ट्रीय चारित्र्य ही आव्हाने भारताच्या सुवर्णमहोत्सवात पुन्हा उद्घोषली गेली. राष्ट्रीय चारित्र्य हे सत्य आणि प्रामाणिकपणा यावर अवलंबून असते.

एकविसाव्या शतकात शास्त्र आणि गणित या विषयांची विशेष आवश्यकता आहे हे जणू सानेगुरुजींनी ओळखलं होतं. सुंदर पत्रात ते लिहितात 'आजकाल हिंदुस्थानला गणित व शास्त्र या विषयांची जास्त गरज आहे. साऱ्या जीवनातच गणिती दृष्टी हवी. गणिती दृष्टी म्हणजे जीवनात काहीही फुकट न दवडण्याची वृत्ती. हिंदुस्थान गरीब देश आहे. एक क्षणही फुकट दवडणे किंवा एक पैही अनाठायी खर्च करणे हा गुन्हा आहे. शास्त्रीय दृष्टी म्हणजे बुद्धीला जे पटेल तेच घ्यायचे, तेच मानायचे, सारा बावळटपणा आणि वायफळपणा फेकून द्यायचा!'

सानेगुरुजींनी 'आंतरभारती'चा विचार मांडला. सत्तेची महत्त्वाकांक्षा न ठेवता केवळ भावनेच्या दृष्टीने भारताने एकत्र यावे ही आंतरभारतीची कल्पना किती उचित होती हे पटते. आजचे तरुण म्हणजे साने गुरुजींची 'धडपडणारी मुले' व्हायला हवीत. संयम, कला, शास्त्रीय दृष्टी आणि अभ्यास हे सर्व तरुणांनी स्वत:त रुजविले पाहिजे.

सानेगुरुजी स्वत: ध्येयवादी होते. त्यांच्या जीवनाला आणि साहित्याला निश्चित विचारांची वैठक होती. त्यांचे स्वत:चे जीवन एक आदर्श चरित्र वाङ्मयाचा नमुना असताना त्यांनी इतरांवरही चरित्रलेखन केले. आजची संस्कृती ही चंगळवादी, भोगवादी संस्कृती आहे. पाश्चिमात्य संस्कृतीचं आक्रमण आणि अनुकरण आम्ही सहज करतो. यापासून दूर होण्यासाठी गुरुजींनी लिहिलेले चरित्र-वाङ्मय वाचले गेले पाहिजे.

१९४६ ला पुण्यात भरलेल्या कुमार साहित्य मंडळाच्या अध्यक्षपदावरून बोलताना, 'लोकांची मनोरचना बदलणे हे थोर साहित्यिकांचे कार्य आहे' हा विचार गुरुजींनी मांडला. समाज आणि साहित्य यांचा अन्योन्य असलेला संबंध यातून स्पष्ट होतो. 'बलसागर भारत होवो' किंवा 'खरा धर्म' यांसारख्या कविता पाठ्यपुस्तकांतून लावल्या जातात म्हणजे त्यांचं अक्षरत्व टिकून आहे यात शंका नाही. भारतीय संस्कृतीचे अनन्यसाधारण महत्त्व, भारतवर्ष जोपर्यंत असेल तोपर्यंत भारतीय संस्कृती टिकेल हा त्यांचा विश्वास तरुणांना विश्वासार्ह वाटतो. भारतीय संस्कृती नष्ट होते की काय हा विचार गळून पडतो.

भारतातील लोकशाही कशी असावी? यासंबंधी मधू लिमयेंना लिहिलेल्या पत्रात



अनुक्रमणिका

त्यांनी लिहिले, 'लोकशाही समाजवादाने रक्तपात न होता अहिंसक आणि शांततामय मार्गाने या देशात क्रांती होऊन या देशातील किसान आणि मजूर यांच्या हाती सत्ता द्यावी.' घटना कागदावर नको, मनात हवी. सामाजिक गुलामगिरी ही मानसिक गुलामगिरी नष्ट झाल्याशिवाय जाणार नाही; तेव्हा ही गुलामगिरी समाजानीच दूर करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. जन्मदात्री माता, भारतमाता आणि जगन्माता यांचे ऋण त्यांनी मानलं आणि साहित्यातून ते फेडण्याचा प्रयत्न केला.

सत्य, शिव, सौंदर्य, मांगल्य, मानवतेचे अधिष्ठान, अहिंसा, प्रामाणिकपणा, परिश्रमपूर्वकता, समानता, सहिष्णूता ही सर्व जीवनाची शाश्वत मूल्ये नव्हेत का? या मूल्यांचाच त्यांच्या साहित्यात आविष्कार आहे म्हणून सानेगुरुजींचे साहित्य आजही टिकून आहे आणि पुढेही टिकेल. या साहित्यात भाबडेपणा आहे, पुनरुक्ती आहे पण त्यातील तळमळ ही अधिक सच्ची आहे, ती दुर्लक्षता येणार नाही. सानेगुरुजींनी संदेश दिला, 'पेरते व्हा! पेरते व्हा! पेरा मुबलक पेरा. सर्वत्र पेरा. निवडक पेरा. म्हणजे सगळीकडे सुगीच सुगी होईल.'

□

सुजाता शेणई
बी-२, शांती दीप, सर्व्हे नं. १८/३/१०,
विठ्ठलनगर, हिंगणे खुर्द, पुणे ४११ ०५१.

---

**संदर्भसाहित्य : सानेगुरुजी यांची पुस्तके**

*काव्य :*

- *पत्री : १९३५ पहिली आवृत्ती तरुण सेवक संघ, अमळनेर एकूण कविता १६३. प्रस्तावना - आचार्य भागवत 'सत्याग्रही' हे खंडकाव्य या आवृत्तीत समाविष्ट आहे. निवडक पत्री - १९४६ दुसरी आवृत्ती. एकूण कविता ९९*
- *स्त्रीजीवन भाग १ व २, १९४० संग्राहक : सानेगुरुजी*

*नाटके :*

- *ते आपले घर, १९३९*
- *निळा पक्षी, १९३९ (मॉरिस मेटरलिंकच्या 'ब्लू बर्ड' या इंग्रजी नाटकाचा अनुवाद)*
- *सोन्यामारुती अर्थात समाजदृश्ये, १९४४*
- *संगीत अस्पृश्योद्‌गार, १९४७*
- *नवमंगलप्रभात : ७ मे ते २८ मे १९४९ या काळात 'साधना'मधून प्रसिद्ध.*
- *रामाचा शेला (अप्रकाशित) लेखनकाल १९३०*
- *ही खरी संस्कृती (अप्रकाशित), १९३१*
- *सावित्री : (अपूर्ण व अप्रकाशित), १९३०*
- *गुरुजींची नाट्यदृष्टी (अप्रकाशित)*

*वैचारिक साहित्य :*

- *गोड निबंध : भाग १ ते ३, १९४४*
- *भारतीय संस्कृती १९३७*
- *माझी दैवते : १९५५*
- *कुमारांपुढील कार्य : १९६६*
- *भारतीय नारी १९९१ (सहावी आवृत्ती)*
- *चंद्रभागेच्या वाळवंटी १९९७ पुनर्मुद्रण*
- *स्वप्न आणि सत्य १९७०*
- *आव्हाने : १९९७*
- *उमाळा, १९९० (चौथी आवृत्ती)*
- *सुंदर पत्रे - भाग १ ते ३*
- *श्यामची पत्रे, १९६४*

*अनुवादित :*

- *खेड्यात जाऊन काय कराल? १९३३*

- *कला म्हणजे काय? १९४३*
  *(टॉलस्टॉय यांच्या व्हॉट इज आर्ट? या ग्रंथाचा अनुवाद.)*
- *कला आणि इतर निबंध (भारतीय चित्र आणि शिल्प) १९६९*
- *समाजधर्म, १९४३*
  *(भगिनी निवेदिता यांच्या 'रिलिजन अँड धर्म' या नावाखाली 'मॉडर्न रिव्ह्यू' मासिकात प्रसिद्ध झालेल्या चौदा इंग्रजी निबंधांचा अनुवाद.)*
- *कल्की अथवा संस्कृतीचे भवितव्य, १९४३ (डॉ. राधाकृष्णन् यांच्या कल्की ऑर द फ्यूचर ऑफ सिव्हिलायझेशन या इंग्रजी पुस्तकाचा अनुवाद.)*
- *ना खेद ना खंत, १९४६*
  *(कृष्णा हाथीसिंग यांच्या आत्मपर पुस्तकाचा अनुवाद.)*
- *कवी तिरुवल्लुवर कुरल, १९४८*
  *(प्राचीन तमीळ काव्याच्या एस्. एस्. अय्यर यांनी इंग्रजीत केलेल्या भाषांतराचे मराठी गद्य भाषांतर.)*
- *मानवजातीची कथा, १९४९*
  *(डॉ. हेन्री थॉमस यांच्या 'द स्टोरी ऑफ ह्यूमन रेस' या इंग्रजी ग्रंथाचा अनुवाद.)*
- *साधना, १९६०*
  *(रवींद्रनाथ टागोरांच्या 'साधना' या इंग्रजीतील पुस्तकाचा संक्षिप्त अनुवाद.)*
- *दिल्ली डायरी*
  *(गांधीजींच्या प्रार्थना सभेतील प्रचवनांचा अनुवाद.)*
- *भारताचा शोध, १९७६*
  *(जवाहरलाल नेहरूंच्या 'डिस्कव्हरी ऑफ इंडिया' या पुस्तकाचा अनुवाद.)*

***चरित्रवाङ्मय :***

- *नामदार गोखले चरित्र, १९२५*
- *ईश्वरचंद्र विद्यासागर, १९२७*
- *पुरातत्त्वभूषण कै. इतिहासाचार्य राजवाडे यांचे चरित्र, १९२८*
- *शिशिरकुमार यांचे चरित्र, १९२९*
- *कविवर्य टागोर, १९३०*
- *स्वराज्य संस्थापक श्री शिवराय, १९९२ (आठवी आवृत्ती)*
- *लोकमान्य टिळक, १९९२ (सातवी आवृत्ती)*
- *आपले नेहरू, १९९२ (नववी आवृत्ती)*
- *भगवान श्रीकृष्ण, १९९२ (सातवी आवृत्ती)*
- *हिमालयाची शिखरे*
- *बापूजींच्या गोड गोष्टी - भाग १ ते ६, १९४८*
- *जीवनाचे शिल्पकार, १९९२*

***इतर संदर्भ :***

- *साने गुरुजी : एक चिकित्सक अभ्यास - पाटील दयाराम तुळशीराम पुणे विद्यापीठात पीएच्. डी.साठी सादर केलेला प्रबंध, १९७४*
- *सानेगुरुजींची जीवनगाथा, १९७५ - राजा मंगळवेढेकर*
- *मंथन - ना. सी. फडके*
- *सानेगुरुजींची पत्रकारिता - यदुनाथ थत्ते*
- *सानेगुरुजी : जीवन, साहित्य आणि विचार - डॉ. अनिल गोडबोले*

---

## स्वागत

- **बालबोध कथा :** अनुराधा फाटक, मनोदय प्रकाशन, मुंबई, पृष्ठे २४
- **नीलनदीचे पाणी :** म. ना. जोशी, मनोदय प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ४०

---



पूज्य सानेगुरुजी

# सानेगुरुजी

## संच क्र. : १ - सानेगुरुजी लिखित पुस्तके

| | | |
|---|---|---|
| श्यामची आई | देवाघरच्या फुलांनो | धडपडणारी मुले |
| श्यामू की माँ (हिंदी) | उमाळा | गोड शेवट |
| श्याम | संस्कृतीचे भवितव्य | कला म्हणजे काय ? |
| भारतीय संस्कृती | (अनुवादित) | गोड गोष्टी - भाग १ ते १० |
| रामाचा शेला | विश्व-भारती | श्री शिवराय |
| अमोल गोष्टी | विचारगाथा | भगवान श्रीकृष्ण |
| कुरल | आव्हाने | माझी दैवते |
| विश्राम | चंद्रभागेच्या वाळवंटी | दिगंबरराय |
| भारताचा शोध (अनुवादित) | हिमालयाची शिखरे | जीवनाचे शिल्पकार |
| शबरी | स्वप्न आणि सत्य | लोकमान्य टिळक |
| सुंदर कथा | विश्व-दर्शन | आपले नेहरू |
| मुलांसाठी फुले | गीताहृदय | भारतीय नारी |
| त्यागातील वैभव | चित्ररूप श्यामची आई | कुमारांपुढील कार्य |
| यज्ञ | आस्तिक | कावळे |
| सोनसाखळी | गोप्या | मोरी गाय |
| सती | दुर्दैवी | दारुबंदीच्या कथा |
| क्रांती | आपण सारे भाऊ | नवा प्रयोग |
| तीन मुले | स्वर्गीय ठेवा | बापूजींच्या गोड गोष्टी - |
| समाजधर्म | मिरी | भाग १ ते ५ |
| राष्ट्रीय हिंदूधर्म | नवजीवन | सुंदर पत्रे |
| छात्रालय | गोष्टीरूप गांधीजी | गोष्टीरूप विनोबा - भाग १-२ |
| चंद्रोदय | स्वदेशी समाज | स्त्रीजीवन |
| | धडपडणारा श्याम | |

**संच क्र. : १ - दर्शनी किंमत रु. : २९००=००**

**संच क्र. : २ - दर्शनी किंमत रु. : १५२५=००**

**दोन्ही संच एकत्रितपणे घेतल्यास सानेगुरुजींचा १५''X१४'' आकाराचा**

**प्राप्तिस्थान : विद्या एजन्सीज् ३८४, सदाशिव पेठ, महाराष्ट्र साहित्य**

## जन्मशताब्दीनिमित्त उपलब्ध केलेली
# यांची ग्रंथसंपदा



**संच क्र. : २ - पूज्य सानेगुरुजींवरील इतर मान्यवरांनी लिहिलेली पुस्तके**

सानेगुरुजी - आठवणीतील : *लिमये/गंधे*
सानेगुरुजींची अप्रकाशित पत्रे : *नारकर/लिमये*
सानेगुरुजी - जीवन, साहित्यविचार : *डॉ. अनिल गोडबोले*
अमृताचा मानसपुत्र - सानेगुरुजी : *पुष्पा मेढेकर*
गोष्टीरूप सानेगुरुजी : *श्यामकांत कुलकर्णी*
सानेगुरुजींच्या गोष्टी : *प्रभा दाते*
सानेगुरुजींची पत्रकारिता : *यदुनाथ थत्ते*
आचार्य विनोबा आणि सानेगुरुजी : *यदुनाथ थत्ते*
सानेगुरुजी : *यदुनाथ थत्ते*
मुलांचे सानेगुरुजी : *यदुनाथ थत्ते*
माणुसकीचा झरा : *आबासाहेब वाघमारे*
पंढरीस वाजे घंटा : *राजा मंगळवेढेकर*
प्रिय पूज्य सानेगुरुजी : *राजा मंगळवेढेकर*
सानेगुरुजी (चरित्र) : *राजा मंगळवेढेकर*
मृगाजिन : *ब. ग. कुलकर्णी*
पूज्य सानेगुरुजी - तत्त्वचिंतन *डॉ. ग. ना. जोशी*
पूज्य सानेगुरुजी - साहित्यचिंतन : *वा. रा. सोनार*

अमृताहुनी गोड : *डॉ. ग. ना. जोशी*
पूज्य सानेगुरुजींचा पोवाडा : *शिसोदे गुरुजी*
सानेगुरुजींची जीवनधारा : *दा. न. शिखरे*
सानेगुरुजींचा पंढरपूर मंदिर प्रवेश लढा : *सुधा बोडा*
धडपडणाऱ्या मुलांची आई -सानेगुरुजी : *डॉ. अशोक कामत*
भले भले हे सानेगुरुजी : *पु. पां. गोखले*
सानेगुरुजी-जीवनप्रसंग : *गोंधळेकर/प्रभु*
अमृतपुत्र : *संपादित*
सानेगुरुजींची सुविचारसंपदा : *डॉ. वि. गो. दुर्गे*
लोकसेवक सानेगुरुजी : *श्रीकृष्ण केसरी*
सानेगुरुजी : *डॉ. प्र. न. जोशी*
संवादरूप श्यामची आई : *डॉ. मु. ब. शाह*
Shyamchi Aai : *Sane Guruji*
सानेगुरुजी : *अशोक अर्धापूरकर*
निवडक सानेगुरुजी : *प्रा. रा. ग. जाधव*



**सवलत मूल्य रु. : २३२०=००** पाठवण्याचा खर्च आमचा
**सवलत मूल्य रु. : १२२०=००** पाठवण्याचा खर्च आमचा
**भिंतीवर लावण्याजोगा लॅमिनेटेड फोटो भेट.** सुटी पुस्तके घेतल्यास १५% सूट
**परिषदेसमोरील विठ्ठल मंदिराजवळ, पुणे ४११ ०३०. फोन - ४३३४४८३**

सानेगुरुजी जन्मशताब्दी विशेष लेख



# गोष्टीवेल्हाळ सानेगुरुजी



डॉ. अनिल गोडबोले

## भारतीय संस्कृती आणि कथाकथन परंपरा

'माणूस हा गोष्टीवेल्हाळ प्राणी आहे.' अशी ज्याने कोणी माणसाची व्याख्या केली तो अत्यंत चतुर असला पाहिजे. वाणी आणि बुद्धी ही मनुष्यप्राण्याला मिळालेली खास ईश्वरी देणगी आहे असे मानले जाते. स्वतःच्या मनातील भाव आणिं विचार व्यक्त करण्यासाठी, जीवन जगताना येणारे अनुभव कळविण्यासाठी त्याने सर्वात प्रथम लेखणीच्या आधी वाणीचा वापर केला. त्यासाठी त्याच्या मदतीला धावून आले ते गोष्ट नावाचे अलौकिक साधन. जगातील कोणत्याही देशाला हेवा वाटावा अशी हजारो वर्षांची गौरवशाली परंपरा भारत देशाला लाभलेली आहे. भारतीय संस्कृतीची ओळख तरुण पिढीला फार पूर्वीच्या काळात आश्रमात शिक्षण घेत असताना ऋषीमुनींनी, आणि नंतरच्या काळात, एकत्र कुटुंब पद्धतीत आजी-आजोबांनी करून दिली. त्यांच्या जोडीला समाजातील कीर्तनकार आणि शाहिरांनी ही परंपरा अबाधित ठेवण्यात मोठाच वाटा उचलला. पण आधुनिक काळात प्रसार माध्यमांच्या वाढत्या अतिक्रमणामुळे बालांना आणि तरुणांना एकत्र जमवून गोष्ट सांगणे हा प्रकार हळू हळू अस्तंगत होत जाणार की काय? अशी भीती वाटू लागली आहे. या पार्श्वभूमीवर यंदाचे वर्षी ज्यांची जन्मशताब्दी सर्वत्र उत्साहाने साजरी होत आहे त्या कै. सानेगुरुजींची सर्वांना तीव्रतेने आठवण होते. भारतीय संस्कृतीतील पुरातन अशी कथाकथन परंपरा जिवंत ठेवून अधिक समृद्ध करण्यासाठी त्यांनी आयुष्यभर अखंडपणे केलेल्या धडपडीचा विचार मनात येताच आपण या थोर महात्म्याच्या चरणी नतमस्तक होतो.

## आधी सांगितले, मग लिहिले

'लिहिणे हा माझा थोडासा स्वधर्म आहे' असे सानेगुरुजी म्हणत. पण थोडासा स्वधर्म असं म्हणत त्यांनी प्रत्यक्षात नियतकालिकांमधून आणि पुस्तकांतून जे लिहिले त्याचे वर्णन आचार्य विनोबा भावे यांनी 'अपरंपार' अशा शब्दात केले आहे. लिहिण्याच्या बरोबरीने सांगणे हा सुद्धा त्यांचा थोडासा स्वधर्म असावा. आजही त्यांच्या सर्व लेखनाला हे सारे लिहिलेले प्रत्यक्षात सांगून पाहिल्याचा जिवंत स्पर्श जाणवत राहतो. त्यांच्या अनेक पुस्तकांच्या प्रास्ताविकांतून किंवा लेखकाचे दोन शब्द या सदरातून ही गोष्ट महाराष्ट्रातील मुलांना आणि तरुणांना चार दोन वेळेला सांगितली आहे.' असा उल्लेख आढळतो. काही ठिकाणी तर ही कथा सांगत असताना त्याचा श्रोत्यांच्या मनावर काय परिणाम झाला याचाही उल्लेख त्यांनी

केला आहे. त्या काळात संशोधनाची आधुनिक साधने किंवा प्रायोगिक पद्धती पुरेशी विकसित झाली असती आणि सानेगुरुजींच्या लेखणीचे आणि वाणीचे सामर्थ्य काय? याचा जर कोणी शास्त्रीय पद्धतीने शोध घेतला असता तर त्यातून त्यांचे जीवनकार्य किती मौलिक आहे हे अधिक प्रभावीपणाने सामान्य वाचकांसमोर आणि अभ्यासकांसमोर आले असते. सानेगुरुजींच्या सहवासात आलेली जुन्या पिढीतील आणि त्यांना कधीही न पाहिलेली पण त्यांच्या वाङ्मयाने प्रभावित झालेली नव्या पिढीतील धडपडणारी मुले यांना मिळालेल्या प्रेरणेतून सानेगुरुजींची स्मृती त्यांच्या निर्वाणाला जवळपास पन्नास वर्षे होत आली तरीही चिरंतन होऊन राहिलेली आहे. मराठी भाषेवर प्रेम करणाऱ्या रसिक वाचकांना सानेगुरुजींचा कधी तरी विसर पडेल का?

**वात्सल्यभक्तीचा वसा**

लिहिणे आणि सांगणे हा जर सानेगुरुजींचा थोडासा स्वधर्म असेल तर त्यांचा खरा स्वधर्म कोणता होता? असा प्रश्न निर्माण होतो. या प्रश्नाचेही उत्तर विनोबाजींनी देऊन टाकले आहे. त्यांच्या मते सानेगुरुजींनी वात्सल्यभक्तीचा वसा घेतला होता. आई होता येणे हे त्यांच्या जीवनातील उदात्त स्वप्न होते. आई होण्यासाठी प्रत्यक्ष स्त्रीचाच जन्म घेण्याची गरज नाही. जिथे अंत:करणात मायेचा अखंड झरा वाहत आहे, जगातील सर्व स्थिरचरावर मनापासून प्रेम आहे आणि 'हे विश्वची माझे घर' असा वैश्विक भाव जिथे वसत आहे तिथे मातृत्त्वाचा अद्‌भूत साक्षात्कार होऊ लागतो. संत शिरोमणी ज्ञानोबांना माऊली म्हणून प्रेमाने साद घालायची ती याच कारणाने. आधुनिक काळात 'माऊली' ही प्रेमाची उपाधी ज्यांच्या मागे अभिमानाने आणि नि:संकोचपणे लावता येईला अशी एक थोर संत विभूती म्हणजेच सानेगुरुजी. वि. स. गवाणकर यांनी त्यांना 'मुलांची मायमाऊली' असं म्हटलंय, तर पु. ल. देशपांडे यांनी त्यांचे वर्णन 'मातृधर्मी सानेगुरुजी' अशा शब्दात केलं आहे. 'माझे ध्येय' या कवितेत सानेगुरुजींमधील ही मातृत्त्वाची ऊर्मी पूर्णांशाने प्रकट झाली आहे. त्यातील काही बोलक्या ओळी अशा आहेत:

करीन सेवा तव मोलवान — असो अहंकार असा मला न
मदीय आहे बळ अल्प देवा — बळानुरूपा मम घेई सेवा
कधी कुणाचे मजला पुसूदे — जलार्द्र डोळे, मग तो हसू दे
अनाथ दीनाजवळी वदेन — सुखामृताचे प्रभु शब्द दोन
कधी करावा पथ साफ छान — कधी करावी मल-मूत्र घाण
बघून रोगार्त करीन घाई — बनेन त्याची निरपेक्ष आई
जया न कोणी, प्रभु मी तयाचा — तदर्थ हे हात, तदर्थ वाचा
कधी कधी मंगल मी लिहीन — कथा नवी वा कविता नवीन
लिहिन मी नाटक वा निबंध — करीन भाषांतर वा सबंध
जगात जे जे सुविचार वारे — मदीय भाषेत भरोत सारे
करीन ज्या ज्या लघुशा कृतीस — तिच्यात ओतीन मदंतरास
मदंतरीची मिसळून भक्ती — मदीय कर्मी मिळवीन मुक्ती

वरील कवितेतील शेवटचे दोन चरण तर सर्वात अर्थपूर्ण आहेत. त्यांच्या वाणीला आणि

लेखनाला कशामुळे सामर्थ्य प्राप्त झाले याचे सारे रहस्य वरील ओळीत दिसून येते. सानेगुरुजींचे सारे साहित्य समजून घ्यायचे असेल तर त्यांचा वर वर्णन केलेला खरा स्वधर्म समजून घ्यायला हवा. या लेखात सानेगुरुजींच्या कथा कादंबऱ्यांमधील काही वैशिष्ट्यांचा धावता आढावा घेतला आहे तो केवळ साहित्यिक कलाकृती म्हणून नाही. मराठीतील काही समीक्षकांनी हा उद्योग या पूर्वी केलेला आहे आणि अधून मधून तो चालूच राहाणार. सानेगुरुजींना उत्तम साहित्यिक म्हणून नावलौकिक मिळवण्याची महत्त्वाकांक्षा कधीच नव्हती. पण तरीही त्यांनी निर्माण केलेल्या साहित्यात प्रचंड सामर्थ्य निर्माण झालेले आहे. या मागचे रहस्य काय? हे समजून घेण्याचा हा लघुसा प्रयत्न आहे. या पुढील काळात या अंगाने त्यांच्या समग्र साहित्याचा अभ्यास होण्याची खरी गरज आहे.

### 'श्यामची आई' मधील आश्रमाची पार्श्वभूमी

'श्यामची आई' हे मराठी सारस्वतातील अमोल असे लेणे आहे. मराठीमध्ये काही लाखांच्या वर प्रतींच्या विक्रीचा विक्रम नोंदविणाऱ्या कलाकृतीत या पुस्तकाला अग्रपूजेचा मान द्यावा लागेल. या पुस्तकाची असंख्य प्रकारची वैशिष्ट्ये सांगता येतील व तो एका स्वतंत्र लेखाचा विषय होऊ शकेल. आजवर माता-बालक प्रेम हा विषय अनेक साहित्यिकांनी हाताळला असेल, पण तरीही या विषयाच्या संदर्भात मराठी माणसाला प्रथम आठवते ती साने गुरुजींची, 'श्यामची आई'. करुणरसाचा उत्कट अविष्कार हे या कलाकृतीचे फार मोठे वैशिष्ट्य आहे. बालकांच्या, तरुणांच्या आणि पालकांच्या मनावर खोलवर ठसा उमटविण्याचे सामर्थ्य हे तर या कलाकृतीचे बलस्थान आहे यात काय संशय ! या पुस्तकात प्रत्येक रात्री एक प्रसंगी आणि सर्व मिळून ४२ रात्री म्हणजे ४२ प्रसंग अशी सर्वसामान्य रचना आहे. प्रत्येक प्रसंगाचे वर्णन सुरू करण्यापूर्वी आश्रमाची पार्श्वभूमी दाखवलेली आहे व त्यात आश्रमवासियांच्यातले काही संवाद दिले आहेत. सानेगुरुजींनी हे सारे कशासाठी केले असावे? याचे रहस्य समजून घेण्याचा प्रयत्न केला तर त्यातून सानेगुरुजींची साहित्यविषयक व जीवनविषयक दृष्टी, तसेच गोष्टी सांगण्यामागची भूमिका कोणती होती याचा उलगडा होत जातो.

नाशिकच्या तुरुंगात असताना ९.२.३३ ते १३.२.३३ अशा पाच रात्री जागून सलगपणे बैठक मारून गुरुजींनी या पुस्तकाचे हस्तलिखित तयार केले. तुरुंगातील काही सहकाऱ्यांना त्यांनी ते वाचून दाखवले. पुस्तकाच्या प्रस्तावनेत गुरुजींनी लिहिले आहे, 'हृदयीचा सारा जिव्हाळा येथे ओतलेला आहे. या गोष्टी लिहित असताना माझे डोळे शतवार ओले झाले होते. हृदय गहिवरून व उचंबळून आले होते. माझ्या हृदयात मातेबद्दलच्या असणाऱ्या प्रेम, भक्ती, व कृतज्ञता यांच्या अपार भावना वाचकांच्या हृदयातही उत्पन्न होतील तर पुस्तक कृतार्थ झाले असे म्हणता येईल. 'आश्रमातील पार्श्वभूमी काल्पनिक असली तरी असं झालं असेल की पुस्तकातील प्रसंग हे त्यांनी श्रोत्यांसमोर सांगून यापूर्वी पाहिले असतील व त्याचा होणारा परिणाम प्रत्यक्षात अनुभवला असेल. या पुस्तकातील प्रसंग सांगणारा कथानिवेदक श्याम आहे. (हे प्रसंग गुरुजींच्या बालपणातील व त्यांच्या आईसंबंधीचे आहेत. 'श्याम' हे

त्यांनी या पुस्तकासाठी घेतलेले टोपण नाव आहे.) प्रारंभ नावाच्या पहिल्या प्रकरणात ही आश्रमाची पार्श्वभूमी सुरू होते. श्यामचे सारे मित्र (आश्रमातील सहकारी) 'तू आमच्या सर्वांचे ऐकून घेतोस, पण स्वत:चे मात्र काहीच सांगत नाहीस?' अशी गोड तक्रार करतात. त्यापैकी राम म्हणतो, 'तुझ्या जीवनात ही माधुरी, प्रेम, सरलता, कोमलता, गोड हसणे, सेवावृत्ती, निरंहकारिता हे सारे कुठून आले ते सांग.' हे सारे ऐकल्यावर श्यामचे मन आईबद्दलच्या आठवणींनी उचंबळून येते. त्याच्या डोळ्यांतून घळघळा अश्रुधारा गळू लागतात. आणि मग 'गड्यांनो हे सारे माझ्या आईचे देणे. आई माझा गुरू, आई कल्पतरू.' असे म्हणून श्याम आईसंबंधीच्या आठवणी सांगायला सुरुवात करतो. रोज रात्री एक या प्रमाणे आई संबंधीच्या आठवणी ऐकायला मिळणार हे ऐकताच सहकाऱ्यांना आनंद होतो. लगेच गोविंदा (आश्रमवासीय) म्हणतो, 'रोजच सुधारस प्यायला मिळणार. रोजच पावन गंगेत डुंबायला मिळणार.' या पहिल्याच प्रकरणातील आश्रमवासियांच्या संवादातून या पुढे सांगितल्या जाणाऱ्या प्रसंगांचा श्रोत्यांच्या मनावर काय परिणाम होऊ शकेल हे सूचित केले आहे. यातील श्यामच्या स्वभावाची काही वैशिष्ट्ये वर उल्लेख केलेली रामच्या तोंडी आलेली आहेत. हे सारे सानेगुरुजींच्या जीवनाचे व त्यांच्या स्वभावाचेच विविध पैलू आहेत असे त्यांच्या सहवासात आलेले अनेक जण सांगतात. त्यांच्या स्वभावाचे प्रतिबिंब त्यांच्या साऱ्याच साहित्यातून स्वच्छपणे उमटल्याचे जाणवते. आईच्या आठवणी सांगण्यासाठी सानेगुरूजींनी



*डॉ. अनिल यशवंत गोडबोले*
*३७९ शनिवार पेठ, लिमये बिल्डिंग,*
*४ था मजला, पुणे ४११०३०.*
*(दूरध्वनी : ४४८१२९५)*

***शैक्षणिक पार्श्वभूमी :*** *अ) एम. ए. (अर्थशास्त्र), ब) एम. ए. (मराठी), क) पीएच. डी. (मानसशास्त्र), संशोधनाचा विषय : कथाकथन, बालकांच्या व्यक्तिमत्त्व विकासाचा एक मार्ग.*

***सामाजिक कार्य :*** *अ) सानेगुरुजी कथामाला या संस्थेतर्फे गेली ३५ वर्षे शालेय विद्यार्थ्यांसाठी कथाकथन. सानेगुरुजी कथाकथन प्रबोधिनीतर्फे, शिक्षक-पालकांसाठीच्या कथाकथन प्रशिक्षण शिबिरातून सहभाग.*

***पुस्तकलेखन :*** *शालेय विद्यार्थी व शिक्षक पालक यांच्यासाठी पुढील पुस्तके प्रसिद्ध : दीपस्तंभ, गाऊ या तेजाची आरती, कथाकथन-मनोरंजन, : शिक्षण आणि संस्कार, कथाकथनातून बालविकास, मानव तितुका एकची आहे, सानेगुरुजी : जीवन, साहित्य आणि विचार, भारतीय स्वातंत्र्याचा लढा, थॉमस एडीसन, सावधान! कोर्ट चालू आहे (बालनाट्य) इ.*

*२३ वर्षे दै. सकाळच्या कार्यालयात संचालकांचा स्वीय साहाय्यक म्हणून नोकरी केल्यानंतर वयाच्या ५१ व्या वर्षी स्वेच्छा निवृत्ती. आता पूर्ण वेळ सामाजिक कार्य, पुस्तक लेखन इत्यादी.*



अनुक्रमणिका

आश्रमाचीच पार्श्वभूमी का निवडली? आश्रम म्हणजे सामुदायिक जीवन जगण्यासाठी लागणाऱ्या संस्कारांचे केंद्र किंवा उगमस्थान. श्यामची आईमध्ये आश्रमाचा भ्रातृसंघ असा (सावित्रि व्रताचा प्रसंग) उल्लेख आढळतो. त्या संदर्भात गुरुजी पुढे म्हणतात, 'सध्याच्या निष्प्रेम काळात, मला काय त्याचे? अशा काळात, असे प्रेमळ संघ म्हणजे परम आशा होय. 'श्यामची आई' या पुस्तकाचा माता-बालक प्रेम हाच विषय आहे. हा विषय मांडण्यासाठी आश्रमाची पार्श्वभूमी किती सुयोग्य आहे हे वाचकांच्या लक्षात येईल. मुकी फुले या प्रसंगातील आश्रमवासियांचा संवाद पाहा —

बारकू 'आई लवकर भाकर वाढ. तिकडे गोष्ट सुरू होईल.' म्हणून घाई करतो, तेव्हा त्याची आई म्हणते, 'रोज रोज रे कसल्या गोष्टी ऐकता? रोज तुझी घाई, जा उपाशीच.' आणि भाकरी न खाताच बारकू गोष्ट ऐकायला निघतो. त्या बारकूच्या पोटाला भाकर पाहिजे होती, परंतु त्याच्या हृदयाला श्यामच्या गोष्टीच पाहिजे होत्या असे गुरुजींचे पुढे भाष्य आले आहे. या बारकुचा उल्लेख पुन्हा एका प्रसंगात येतो. श्याम विचारतो. 'अरे आज बारकू गोष्ट ऐकायला आला नाही. आज दुपारी गायीला काठीने मारत होता म्हणून मी त्याला रागवलो.' बारकू आत यायला लाजतो असे कुणी तरी म्हणते. मग श्याम स्वत: बारकूला हाताला धरून गोष्ट ऐकण्यासाठी त्याच्या जवळ बसवतो. गंमत म्हणजे त्या दिवशी श्याम गोष्ट सांगतो ती मोऱ्या गायीवर आईने कसे प्रेम केले या प्रसंगाची. सानेगुरुजींच्या साहित्यात पुनरुक्ती, पाल्हाळ, पसरटपणा आहे, नेटकेपणा व नेमकेपणा नाही हा समीक्षकांचा मुख्य आक्षेप. सानेगुरुजींनाही बोलण्याच्या आणि लिहिण्याच्या नादात आपण वाहावत जातो याची जाणीव होती, पण गोष्ट ऐकणाऱ्या श्रोत्यांना असे विषयांतर सुद्धा आवडते हे त्यांच्या प्रत्यक्ष अनुभवाला आले असावे. श्यामची आईमध्ये आश्रमवासियांच्यात या आशयाचा एक संवाद आहे. आक्काचे लग्न हा प्रसंग सांगत असताना हुंड्यांच्या चालीचा विषय निघतो आणि गुरुजींना हुंड्याची चाल नाहीशी व्हावी म्हणून बंगाल प्रांतात स्वत:ला जाळून घेणारी स्नेहलता आठवते. मग स्त्रियांच्या वाट्याला येणारे दु:ख या विषयावर त्यांचे बरेचसे भाष्य येते. आणि मग 'मी भावनाभरात थोडे वाहावत चाललो का?' असे वाक्य श्यामच्या तोंडी टाकले आहे. यावर नामदेव म्हणतो, 'तुम्ही भलतीकडे वाहावत गेलेत तरी आम्हाला मधच मिळणार. आडरानात गेलात तरी फुलेच दाखवणार.' नामदेव म्हणतो, 'तुमचे काहीही असो ते गोड लागते. तुम्ही गोष्ट सांगा वा प्रवचन द्या. आम्हाला आनंदच आहे.' हे संवाद वाचत असताना असे वाटत राहते की बारकू, नामदेव, गोविंदा असे गोष्ट ऐकणारे श्रोते गुरुजींना त्यांच्या आयुष्यात नक्की कुठे तरी भेटले असणार. रामसारखा एखादाच श्रोता असेल की ज्याला मुद्याशी गाठ असणे आवडते, पण इतर अनेकांच्या बाबतीत तुम्ही जे सांगाल ते छानच असणार अशीच प्रतिक्रिया असावी. समीक्षकांनी टीका करून सुद्धा गुरुजींनी त्यांच्या मांडणीत किंवा शैलीत कोठेही बदल केलेला नाही यामागे त्यांना भेटणारे श्रोते हेही एक कारण असू शकेल का?

**या कथा खास बाल वाचकांसाठी!**

सानेगुरुजींची गणना सरसकट बाल साहित्यिकात केली जाते. असे करताना आपण या

साहित्यिकावर घोर अन्याय करतो असे कोणाच्या मनात कसे येत नाही? मुलांसाठी लिहिणे फार सोपे आहे, मुलांसाठी लिहिलेले साहित्य खऱ्या अर्थाने श्रेष्ठ साहित्यच नाही असे अनेक अपसमज आज समाजात पसरलेले आहेत. सानेगुरुजींच्या कथा आणि कादंबऱ्यांचा विचार करता त्यातील ७५ टक्के पुस्तके आणि त्यातील विषय हे तरुण आणि प्रौढ श्रोत्यांसाठी आहेत असे लक्षात येते. गोष्ट ऐकण्यासाठी सानेगुरुजींच्या समोर नेहमी मुलेच होती असेही आढळत नाही. त्यांनी कारागृहातील राजबंद्यांना गोष्टी सांगितलेल्या आहेत. सेवादलातील प्रौढ आणि युवक कार्यकर्त्यासमोर गोष्टी सांगितलेल्या आहेत. पण एक गोष्ट मात्र त्यांच्या सहवासात आलेले अनेक जण सांगतात. सानेगुरुजी हे मोठ्यांच्या पेक्षा लहान मुलांच्यातच अधिक रमायचे. मुलांसाठी त्यांनी लिहिलेल्या कथांमधील भाषा ही सुगम, प्रासादिक आणि बालवाचकांच्या हृदयाचा ठाव घेणारी आहे. किंबहुना कथनियतेचे संस्कार करूनच गुरुजींनी या कथा बोली भाषेत बालवाचकांसमोर मांडलेल्या आहेत.

सानेगुरुजींनी खास मुलांसाठी म्हणून ज्या गोष्टी लिहिल्या आहेत त्या प्रामुख्याने मुलांसाठी फुले, सुंदर कथा, सोनसाखळी, अमोल गोष्टी, शबरी, यज्ञ, त्यागाचे वैभव, त्रिवेणी, मोरी गाय, बापूजींच्या गोड गोष्ट (६ भाग) काही लघु चरित्रात्मक पुस्तके, गोड गोष्टी आणि आवडत्या गोष्टींचे काही भाग इ. पुस्तकांतून आढळतात.

**'मुले म्हणजे देव' कथेतील राजा !**

सानेगुरुजींच्या सोनसाखळी या पुस्तकात 'मुले म्हणजे देव' नावाची एक कथा आली आहे. मला ती खूप अर्थपूर्ण आणि सानेगुरुजींच्या व्यक्तिमत्त्वावर प्रकाश टाकणारी वाटते. या गोष्टीतील राजा हा लोकांच्या दृष्टीने विचित्र वागणारा होता. तो काय करायचा? रस्त्यानं जाताना वाटेत कोणीही लहान मूल दिसले की त्याला तो वाकून नमस्कार करायचा. म्हाताऱ्यांना किंवा वडीलधाऱ्यांना नमस्कार करावा ही तर सर्वसामान्य जनरीती, आणि हा राजा मुलांना कसला नमस्कार करतो? हा वेडेपणा आहे असं लोकांना वाटायचं. राजा असं का वागत होता? प्रधानानं विचारलं असता राजानं उत्तर दिलं, 'जे लोक म्हातारे झालेत त्यांचा सारा पराक्रम लोकांना कळून चुकला आहे. त्यांची काय कर्तबगारी आहे ही सर्वांना कळून आली आहे. पण लहान मुले पाहिली की मनात येते, यांच्यातून उद्या कोण कोण निर्माण होईल कोणास ठाऊक? यांच्यातून मोठे कवी निघतील, चित्रकार निघतील, साधुसंत निघतील किंवा थोर शास्त्रज्ञही निघतील. हे सर्व काही शक्य आहे. म्हणून मी मुलांना वंदन करतो. त्यांच्यातील त्या अप्रकट शक्तीला नमस्कार करतो.' यावर प्रधानजी म्हणतात, 'महाराज, आपले करणे बरोबर आहे. आम्हीच वेडे आहोत. आपण दूरचे बघणारे आहात.' ही गोष्ट वाचत असताना मला तर त्या राजाच्या ठिकाणी चक्क सानेगुरुजीच दिसू लागतात. खरोखरीच मुलांच्यात मूल होऊन रमणारा आणि मुलांच्यात देव पाहाणारा सानेगुरुजींच्या सारखा थोर साहित्यिक क्वचितच दुसरा कोणी आढळेल. 'मुले म्हणजे देव, मुले राष्ट्राची मोलाची ठेव' असं ते नुसतं तोंडानं म्हणत नव्हते. त्यांच्या प्रत्यक्ष कृतीतून हा भाव प्रकट होत होता. त्यांच्या सर्व कथा मुलांना नुसत्या रडविणाऱ्या किंवा गंभीर करणाऱ्या आहेत असेही नाही. या कथा लिहित असताना

त्यांना मुलांचं भावविश्व चांगल्या प्रकारे समजलं होतं असं सतत जाणवतं. म्हणून तर त्या बालवाचकात इतक्या लोकप्रिय झाल्या. त्यांना मनोरंजनाचे अजिबात वावडे नव्हते. त्या कथा लिहिताना गुरूजी मुद्दामहून काही तरी शिकवायला बसले आहेत असं कधीच जाणवलं नाही. पण नकळत का होईना, या कथा बालकवाचकांना अंत:र्मुख करतात यात काय संशय! त्यांचे ब्रीदवाक्य तर सर्वांनाच माहित आहे, 'करी मनोरंजन जो मुलांचे, जडेल नाते प्रभुशी तयाचे' मनोरंजन तर हवं, पण ते कसं असावं? प्रभूशी नातं जोडणारं, असं झालं तर ते सवंग पातळीवरचं किंवा उथळ आणि वरवरचं असेल का? विचार करण्यासारखी बाब आहे.

**जया न कोणी, प्रभू मी तयाचा!**

मुलांसाठी लिहिलेल्या कथांमधून सुद्धा सानेगुरुजींची सहानुभूती नेहमी दु:खी, पीडित, ज्यांच्यावर अन्याय झाला आहे असे, सज्जन आणि गुणी, पण परिस्थितीनं गांजलेले अशांकडं अधिक असल्याचं जाणवतं. जे संपन्न आहेत, श्रीमंत आहेत, समजात प्रतिष्ठित आहेत, सत्ताधिश आहेत, दुसऱ्यावर अधिकार गाजवणारे आहेत, वरवरचे पाहणारे आहेत त्यांच्याबद्दल गुरुजींच्या मनात राग आहे, पण सूडाची भावना नाही. केलेल्या दुष्कृत्यांचा पश्चात्ताप होणं ही शिक्षा त्यांना पुरेशी वाटते. त्यांच्या कथांमधून नेहमी सत्पक्षाची बाजू घेतलेली आढळते. दुष्ट प्रवृत्तींचा विजय झाला असं त्यांच्या एकाही कथेत सापडणार नाही. न्याय जिवंत झाला गोष्टीत भिम्याला न्याय मिळतो, केशवचंद्रांकडून त्याची लुबाडलेली जमीन परत मिळते. पण केशवचंद्राला शिक्षा करा असं काही भिम्या सांगत नाही. उलट त्यांनाही आमच्याबरोबर शेतात काम करू द्या म्हणजे आम्हा गरीबांची दु:ख त्यांना कळतील असं तो म्हणतो. सानेगुरुजींना लोकशाही समाजवादाच्या मार्गाने समाजात क्रांती व्हायला हवी होती. आज कदाचित कुणाला हा भाबडा आशावाद वाटत असेल, पण सानेगुरुजींची या विचारांवर श्रद्धा होती, व आयुष्याच्या अखेरपर्यंत ते या भूमिकेशी ठाम राहिले. सानेगुरुजींच्या कथांमधून सावत्र आई हे पात्र बऱ्याच वेळा दिसते. पण या सावत्र आईला गोष्टीत शिक्षा झाल्याचे कोठेही आढळत नाही. माणूस हा मुळात वाईट प्रवृत्तीचा नसतो, परिस्थितीने त्याच्यात खलप्रवृत्ती प्रबळ होते. पण पाप केलेल्या माणसाला त्याने केलेली चूक सुधारण्याची संधी मिळाल्यास तो आयुष्यात सन्मार्गाने जाऊ शकतो, हेच गुरुजींना त्यातून दाखवायचे आहे. गोड गोष्टींमधील 'दु:खी' आणि 'नदी शेवटी सागराला मिळते' या गोष्टींतून सुद्धा हीच विचारधारा प्रकट झाली आहे.

**आजची मुले सानेगुरुजींची पुस्तके वाचतील का?**

सानेगुरुजींचा श्याम आता कालबाह्य झाला अशी हाकाटी अनेक वेळा समीक्षकांकडून ऐकू येते. सानेगुरुजींचा श्याम एके काळी लोकप्रिय होता हे समीक्षक अप्रत्यक्षपणे मान्य करतात हेही नसे थोडके. केवळ श्यामबद्दलच नाही, तर एकंदरीतच सानेगुरुजींच्या मुलांसाठी आणि मोठ्यांसाठी लिहिलेल्या कथा-कादंबऱ्यातील पात्रांबाबत खूप वेळा अत्यंत हेटाळणीने बोलले जाते. सानेगुरुजींची राजकीय, सामाजिक किंवा धर्मविषयक मते न पटल्यामुळे मोठ्यांच्या आणि मुलांच्याही मनात त्यांच्याबद्दल अनेक प्रकारचे पूर्वग्रह असल्याचे आढळते. ते काहीही असो, पण मुलांच्या दृष्टीने त्यांच्या कथांमधील काही गोष्टी कालबाह्य झाल्या आहेत का?



अनुक्रमणिका

असल्यास मुलांच्या समोर मांडताना त्यात कालोचित असा काही बदल करता येणे आवश्यक आणि शक्य आहे का? याचा विचार व्हायला हवा हे निश्चित.

सानेगुरुजींची श्यामची आई खूप लोकप्रिय झाली. याच मालिकेतील अन्य भावंडे म्हणजे श्याम (खंड १) धडपडणारा श्याम किंवा जीवन कलह, जीवन विकास ही पुस्तके श्यामच्या आई इतकी प्रभावी नसतील, पण त्यातील कित्येक प्रसंग मुलांसमोर पोचायला हवेत. त्यातील धडपडणारा श्याम या पुस्तकाचा तर आवर्जून उल्लेख करायला हवा. औंधला श्याम मधुकरी मागून शिक्षण पूर्ण करत होता एवढेच ज्यांना माहित आहे असे अनेक जण म्हणतात की, आता मधुकरी मागणे हा प्रकार बंद झाला आहे, मग हे आजच्या मुलांना कशाला सांगायचे. परिस्थिती बदलली हे खरे आहे. पंण या प्रसंगातील आत्मा, विद्येसाठी केलेली धडपड-हा चिरंतन आहे. वार लावून जेवणे हाही प्रकार तसा आता कालबाह्य. काही तपशील कालानुरूप बदलतो हे मान्य आहे. पण म्हणून या कथेचा चरित्रनायक श्याम हा कालबाह्य झाला असे कसे म्हणता येईल? श्यामने विद्येसाठी केलेली धडपड वाचून आजच्या मुलांच्या मनात, बदलत्या काळाच्या संदर्भात स्वत:च्या पायावर उभे राहून शिक्षण पूर्ण करण्यासाठी हातपाय हालवले पाहिजेत, काही तरी मार्ग शोधून काढला पाहिजे अशी प्रेरणा निर्माण होणे अशक्य आहे का? तसा विचार केला तर भारत स्वतंत्र होऊन आज पन्नास वर्षांपेक्षाही अधिक काळ लोटला. परिस्थिती बदलली. नव्या काळांच्या संदर्भात काही नवे प्रश्न निर्माण झाले. याचा अर्थ असा होतो का की स्वातंत्र्यासाठी स्वत:चे जीवनपुष्प स्वेच्छेने समर्पण करणाऱ्या स्वातंत्र्य-वीरांच्या कथा आता कालबाह्य झाल्या? काळ बदलला, पण देशभक्ति, देशासाठी करावा लागणारा त्याग ही मूल्ये कधी तरी कालबाह्य होतील का? शिवाजीच्या वेळच्या गड-कोटांचे महत्त्व आज राहिलेले नसेल, युद्धविषयक साधने आणि इतर गोष्टीत बदल झाला. पण म्हणून शिवाजी कालबाह्य झाला का? हाच निकष सानेगुरुजींच्या श्यामबाबत का लावला जाऊ नये. मी तर पुढे जाऊन असे म्हणेन की पालकांनी आणि प्रौढांनी श्यामची आई आणि श्यामसंबंधीचे इतर पुस्तकातील प्रसंग मुलांसमोर सांगून पाहावेत. मुलांना यातील काय आवडते? काय नाही? याचा स्वत:च प्रत्यय घ्यावा. मत-मतांतरांच्या जंजाळात शिरण्यापेक्षा या संदर्भात आत्मप्रत्यय हा प्रमाण मानला जावा.

मुलांसाठी सानेगुरुजींनी लिहिलेल्या अनेक कथांमधून सावत्र आईचा उल्लेख आढळतो. सावत्र आई ही आता कालबाह्य झाली. आता सावत्र आईने मुलांचा छळ केला, मुलांचे हालहाल केले हे सांगायचे का? हाही प्रश्न अनेक वेळा विचारला जातो. आजच्या काळात कायद्यामध्ये एक पत्नी जिवंत असताना दुसरे लग्न करायचे नाही असे म्हटलेले आहे. सुशिक्षित समाजात कदाचित फारसे प्रमाण नसेल, पण बहुजन समाजात कायदा धाब्यावर बसवून अनेक स्त्रियांशी अगदी राजरोसपणे संबंध ठेवणारे महाभाग काही कमी नाहीत. अगदी सख्ख्या मुलांच्यात सुद्धा, काही कारणपरत्त्वे असेल, पण आईचे सर्वच मुलांवर सारखेच प्रेम असते असेही नाही. आधी झालेलं मूल आणि नंतर झालेलं मूल यांना मिळणारं प्रेम (जरी एकाच आईची मुलं असली) तरी तिचं दोन्ही मुलांवर सारखंच प्रेम असतं का? एखाद्या मातेचं

स्वत:च्या मुलांवर प्रेम असेल, पण शेजाऱ्यापाजाऱ्यांची मुले, जवळच्या आणि दूरच्या नातलगांची मुले यांच्याकडेही ती तितक्याच प्रेमानं पाहत असेलच असं नाही. आपला तो बाळ्या, आणि दुसऱ्याचं ते कार्ट या उक्तीचा प्रत्यक्ष जीवन जगताना अनेक वेळा प्रत्यय येत असतो. या व अशा अनेक कारणांमुळे मुलांवर मोठ्या माणसांकडून कळत नकळत अन्याय होत असतो. मुलांच्या मनात सतत असंतोष खदखदत असतो. सावत्र आईकडून मुलांवर झालेला अन्याय फार तर प्रतिकात्मक आहे असे आपण समजू या. मुलंही गोष्ट ऐकत असताना किंवा वाचत असताना हे सारे वाच्यार्थानं घेत नाहीत. उलट आपल्यासारखाच कुणी तरी समदु:खी गोष्टीतून भेटल्यानंतर त्यांच्या मनातील गाऱ्हाण्यांना वाट मोकळी मिळाल्याने त्यांच्या मनावरील दु:खभार काहीसा हलका होतो.

सानेगुरुजींच्या सर्वच्या सर्व कथा जशाच्या तशा बालवाचकांपर्यंत पोचवाव्यात असा कोणीही आग्रह धरू नये. पण त्यातील अनेक कथांमध्ये सुंदर अशी कथाबिजे आहेत. साध्या सोप्या भाषेतून बालवाचकांच्या हृदयाला हात घालण्याचे कौशल्य सानेगुरुजींना चांगल्या प्रकारे साधलेले आहे. त्या कथांमध्ये कालानुरूप काही संस्करण करून, थोडीफार भर घालून त्या आजच्या मुलांपर्यंत पोचवता येणे सहज शक्य आहे. आजच्या मुलांच्या दृष्टीने सानेगुरुजींच्या कथा कालबाह्य झाल्या आहेत असं मला तरी वाटत नाही.

**सानेगुरुजींच्या कादंबऱ्या - राजकीय आणि सामाजिक संदर्भ**

तरुण आणि प्रौढांसाठी सानेगुरुजींनी जे काही लिहिले त्यात कादंबऱ्यांचा समावेश प्रामुख्याने होतो. कादंबरी लेखनासाठी लागणारे सफाईदार लेखन कौशल्य सानेगुरुजींच्याकडे होते का? हा वादग्रस्त मुद्दा असू शकेल. कलात्मतेच्या निकषावर घासून पुसून पाहिलं तर त्यात अनेक दोषस्थले आहेत हे केवळ समीक्षकच नाहीत तर अगदी सामान्य वाचक सुद्धा मान्य करतील. पुनरुक्ती, पाल्हाळ, वर्णनातील आणि रचनेतील तोचतोचपणा अशा काही दोषांमुळे त्यांच्या काही कादंबऱ्या आजच्या तरुण आणि प्रौढ वाचक वर्गाला कितपत वाचनीय वाटतील आणि रुचतील याबद्दल अनेकांच्या मनात संदेह असेल तर तोही समजण्यासारखा आहे. हे सारे मान्य करूनही या कादंबऱ्यांनी त्यांच्या काळातील तरुण-प्रौढ वाचक वर्गावर कमालीची मोहिनी घातलेली होती हे विसरून चालणार नाही. असे होण्याचे प्रमुख कारण म्हणजे त्यांच्या कादंबऱ्यांना लाभलेला त्या काळातील परिस्थितीचा राजकीय व सामाजिक संदर्भ.

सानेगुरुजींचे बरेचसे कादंबऱ्या लेखन हे १९३०-४५ च्या दरम्यान झाले आहे. त्यावेळी देशामध्ये स्वातंत्र्य लढ्याचे वारे वाहत होते. महात्मा गांधींच्या नेतृत्त्वाखाली अनेक तरुण घरादाराचा आणि नोकरी-व्यवसायाचा त्याग करून स्वातंत्र्य लढ्यात उतरले होते. स्वत: सानेगुरुजींनी स्वातंत्र्य लढ्यात भाग घेता यावा यासाठी अंमळनेर येथील छात्रालय शाळेचा निरोप घेतला. त्यात भाग घेतल्याबद्दल गुरुजींना अनेक वेळा कारावास भोगावा लागलेला आहे. त्यांनी लिहिलेल्या बहुसंख्य कादंबऱ्यांचा जन्म हा कारागृहात झालेला आहे. स्वातंत्र्य प्रेमाचे मंतरलेले दिवस असे त्या दिवसांचे वर्णन केले जाते. सहिजिकच या वातावरणाचे प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष प्रतिबिंब सानेगुरुजींच्या कादंबऱ्यांमधून उमटले नसते तरच आश्चर्य वाटले



अनुक्रमणिका

असते. दुसरे असे, इंग्रजांच्या विरुद्ध स्वातंत्र्यासाठीचा लढा हा झाला राजकीय बदल. पण सानेगुरुजींना राजकीय बदलाबरोबरच सामाजिक क्रांती व्हायला हवी होती. स्वराज्य मिळाले तरी स्वराज्याचे सुराज्य कसे होईल ही चिंता त्यांना लागून राहिली होती. 'आता उठवू सारे रान, आता पेटवू सारे रान.' असा नारा त्यांनी दिला. पण हे रान कशासाठी पेटवायचे? तर शेतकऱ्यांचे आणि कामकऱ्यांचे राज्य या देशात स्थापन व्हावे यासाठी. स्वराज्यात सामाजिक वा आर्थिक विषमता नष्ट झाली आहे, सर्व धर्माचे, पंथाचे आणि भाषांचे लोक या देशात सुखनैव नांदत आहेत असे स्वप्न ते पाहात होते. आणि हे सारे बंदुकीच्या जोरावर नाही तर लोकशाही समाजवादाच्या मार्गाने. त्यांच्या मृत्यूपूर्वीच्या अखेरच्या चिठ्यांमधून त्यांच्या मनातील याच विचारांचे प्रतिबिंब पडल्याचे जाणवते. त्यांच्या मनातील या ध्येयस्वप्नांच्या पूर्तीसाठी त्यांनी कादंबरी लेखनाचा प्रपंच मांडला. तेव्हा या कादंबऱ्यांचे मोल कलेच्या कसोट्या लावून तपासून पाहण्यापेक्षा, त्यांना अपेक्षित असलेल्या राजकीय आणि सामाजिक क्रांतीच्या दृष्टीने त्यांची फलश्रुती काय? हे तपासून पाहायला हवे.

आपण सारे भाऊ, गोप्या, क्रांती, संध्या, धडपडणारी मुले, नवा प्रयोग, पुनर्जन्म, दिनबंधू, दिगंबर राय, आस्तिक या कादंबऱ्यांचा या संदर्भात आवर्जून उल्लेख करायला हवा. सानेगुरुजींच्या या सर्व कादंबऱ्यांमधील पात्रे ही सतत त्यांच्याच मनातील ध्येयवादाची भाषा बोलताना आढळतात. काही कादंबऱ्यांचे नायक म्हणजे सानेगुरुजींची जणू दुसरी प्रतिकृती असेच म्हणावेसे वाटते. काही उदाहरणाने हा मुद्दा अधिक स्पष्ट होऊ शकेल. आपण सारे भाऊ या कादंबरीतील चरित्रनायक कृष्णनाथ हा खरे तर लहानपणापासून व्यक्तिगत जीवनात खूप पोळलेला आहे. लहान वयातच त्याचे आई-वडील देवाघरी जातात. त्याचा थोरला भाऊ रघुनाथ आणि रमावहिनी त्याचे खूप हाल करतात, त्याला सर्कसमध्ये पाठवतात, तिथंही त्याला प्रेमाचं कोणीही नाही. सर्कसच्या आवारात रडत बसलेला असताना माधवराव त्याला प्रेमानं जवळ घेतात, स्वतःच्या घरी नेतात, त्याला शिकवतात आणि इथून पुढे त्याच्या जीवनाचा नवा अध्याय सुरू होतो. माधवरावांच्या मुलीशी, विमलशी तो लग्न करतो. तो आणि विमल दोघेही स्वातंत्र्य लढ्यात भाग घेतात, कारावासही भोगतात, तसेच सर्वोदयाच्या विचारांची अनुभूती देणारी स्वराज्यवाडी उभी करतात आणि ज्यांनी कृष्णनाथला खूप छळलं त्या रघुनाथ आणि रमावहिनी यांना सुद्धा या स्वराज्यवाडीत आश्रय देतात. हा कृष्णनाथ साने-गुरुजींचा मानसपुत्र शोभावा असाच आहे. गोप्या कादंबरीतील चरित्रनायक गोप्या,हा त्याच्या आयुष्याच्या पूर्वार्धात असाच सतत दुर्दैवाच्या फेऱ्यात सापडलेला दाखवला आहे. पण तो पुढे शेतकऱ्यांच्या प्रश्नासाठी लढा उभारू लागतो आणि मग त्याच्या जीवनाला एक निराळीच कलाटणी मिळते आणि अखेरीस तो त्याच्या मनातील ध्येयस्वप्नांच्या पूर्तीसाठी हौतात्म्य पत्करतो. त्यांच्या वर उल्लेख केलेल्या कादंबऱ्यातील केवळ चरित्रनायकच नाही तर इतरही अनेक पात्रे ध्येयवादाचीच भाषा बोलताना आढळतात. उदा : नवा प्रयोग कादंबरीतील न्यायालयातील धनाच्या भाषणातील काही भाग : 'हे भांडवालदार, कारखानदार यांना माणुसकी नाही. केवळ नफा म्हणजे त्यांचे दैवत. समाजद्रोहाचे पाप ते आहोरात्र करीत आहेत. समाजातील

अशांतीला खरोखर ते कारणीभूत आहेत.' क्रांति कादंबरीतील रामदास कादंबरीच्या अखेरीस भविष्य वाणी उच्चारतो : 'मुकुंदराव, मोहन, शांता, मीना यांनी क्रांतीचं बी पेरलं. त्याचा महावृक्ष होईल. त्यांनी ठिणगी पेटवली त्यातून आगडोंब उसळेल.' याच कादंबरीतील दयाराम म्हणतो, 'सर्व देशातून क्रांती होईल. जगातील पिळले जाणारे सारे एक होतील.' साने गुरुजींनी अंतरभारतीचे स्वप्न उराशी बाळगले होते. त्यांच्या दिनबंधू कादंबरीतील पुढील वर्णन पाहा.' मायेनं वंग भाषेत महाराष्ट्राची थोरवी म्हणून पुस्तक प्रसिद्ध केलं आहे. बाबूने मराठीत बंगालचा गेल्या शंभर वर्षांचा इतिहास हे पुस्तक प्रसिद्ध केलं आहे. परस्पर प्रांतांची हृदये जवळ येऊ लागली आहेत. भारतात ऐक्य वाढू लागले आहे. 'वर उल्लेख केलेल्या कादंबऱ्यांच्या पाना पानातून आणि वाक्या वाक्यांमधून सानेगुरुजींच्या ध्येयवादाचा सुगंध दरवळतो आहे. कुणाला कदाचित हे भाबडे स्वप्नरंजन वाटेल.

पण सानेगुरुजींनी त्यांच्या मनातील ध्येयस्वप्नांच्या पूर्तीसाठी त्यांचे सारे आयुष्य पणाला लावले होते ही गोष्ट निर्विवाद आहे. वरील कादंबऱ्यांचे आणखी काही विशेष सांगता येतील. त्यांच्या या कादंबऱ्यातील नायिका या सुद्धा ध्येयवेड्याच आहेत. त्या ध्येयवेड्या तरुणांवर चटकन लुब्ध होतात. त्यांच्याशी विवाह करायला तयार होतात. पतीबरोबर वैभव नाही तर वनवास भोगावा लागणार आहे हे त्यांना माहित असूनही त्या डोळसपणे हा निर्णय घेतात. असा निर्णय घेतल्याबद्दल त्यांना पश्चात्ताप झालाय असं एकाही कादंबरीत आढळत नाही. त्या काळी लोकप्रिय असलेले ज्येष्ठ कादंबरीकार प्रा. ना. सी. फडके यांच्या कादंबऱ्यातील नायिकांपेक्षा सानेगुरुजींच्या कादंबऱ्यांमधील चरित्रनायिकांची जातकुळी अगदी निराळ्या प्रकारची आहे हे वाचकांच्या चटकन लक्षात येईल. आणखी एक वैशिष्ट्य असे की सानेगुरुजींच्या कादंबरीतील चरित्रनायकांना त्यांच्या ध्येयस्वप्नात सहभागी होणारे अनुयायीही मिळत जातात. त्या दृष्टीने धडपडणारी मुले ही कादंबरी आदर्श ठरावी. देशामध्ये हिंदु-मुस्लिमांचे दंगे ही नित्याची बाब होऊन बसली होती. इंग्रजांनी धर्मांधतेची ही विषवल्ली जाणीवपूर्वक जोपासली, आणि दुर्दैवाने आम्ही या फोडा आणि झोडा या कुटील नीतीला वारंवार बळी पडत गेलो. या पार्श्वभूमीवर या कादंबरीची सुरुवात होते ती अंमळनेरमध्ये विश्वधर्म मंडळातर्फे महंमद पैगंबरांची जयंती साजरी होत असल्याच्या प्रसंगाने. सतत भ्रमंती करणाऱ्या स्वामींचे पाय तिथं स्थिरावतात. तिथल्या तरुणांना आणि प्रौढांना स्वामीजी खूप आवडतात. स्वामींनी तिथे राहावं म्हणून ते सतत आग्रह करतात. स्वामीजींच्या तालमीत तिथे रचनात्मक आणि विधायक कामाला उत्साहाने सहभागी होणारे अनेक धडपडणारे तरुण तयार होतात. यातील स्वामीजी म्हणजे प्रत्यक्ष साने गुरुजी आणि त्यांच्या प्रभावळीत तयार झालेली ती धडपडणारी मुले असे समजायला काहीच हरकत नाही. धडपडणारी मुले हा सानेगुरुजींचा आवडता शब्दप्रयोग होता. आजही त्यांच्या सहवासात आलेले अनेक कार्यकर्ते 'आम्ही सानेगुरुजींची धडपडणारी मुले आहोत' असे अभिमानाने सांगतात. सानेगुरुजींच्या कथित आणि लिखित शब्दांची ही फलश्रुतीच नव्हे का? सानेगुरुजींच्या साहित्यात इथून तिथून सगळीकडे रडारड आहे अशी ओरड ऐकू येते. पण त्यांच्या कादंबऱ्यांमधील राजकीय आणि सामाजिक क्रांतीचा हा आशावादी सूर मनाला

दिलासा देणारा नाही का?

**'स्वर्गीय ठेवा' आणि 'सती'**

सानेगुरुजींच्या सर्वच कादंबऱ्या प्रचारकी थाटाच्या आहेत असं नाही. काही कादंबऱ्यांमध्ये काही सामाजिक प्रश्न हाताळले आहेत. उदा : त्यांच्या नवजीवन कादंबरीतील रूपा ही तर चक्क वेश्या आहे. 'रामाचा शेला' मधील सरला आणि मिरी या अशाच दुर्दैवाच्या फेऱ्यात सापडलेल्या दुःखी चरित्रनायिक आहेत. पण यापेक्षाही उत्तम कथाबीजे असलेल्या दोन कादंबऱ्यांचा आवर्जून उल्लेख करायला हवा. या कादंबऱ्यांवर आधारित एखादे नाटक, चित्रपट किंवा दूरदर्शन मालिका तयार करता येणे शक्य आहे. 'स्वर्गीय ठेवा' या कादंबरीतील चरित्रनायक आनंदराम हे मुंबईतील उतारवयातील एक श्रीमंत गृहस्थ. आपण फार दिवस जगणार नाही हे त्यांना जाणवतंय. पण निरपेक्ष प्रेमाचा अनुभव म्हणजेच स्वर्गीय ठेवा गवसल्याशिवाय मरायचं नाही असा त्यांनी निश्चय केला. ते स्वतःची सारी संपत्ती मागे ठेवून, अंगावर फाटके कपडे घालून अशा प्रेमाच्या शोधार्थ निघतात. या भ्रमंतीत त्यांना आलेले निरनिराळे अनुभव हाच मुख्यतः या कादंबरीचा विषय आहे. वेगळ्या प्रकारचा विषय असून त्याची मांडणीसुद्धा चांगली झालेली आहे. 'सती' : या कादंबरीचा विषय सुद्धा नाविन्यपूर्ण असा आहे. धोंडभटजी या पुराणिकांची मुलगी मैना ही ब्रह्मवादिनी होण्याचे स्वप्न पाहात असते. गावाबाहेरच्या शिवाच्या देवळात गोपाळ नावाचा असाच एक भगवद्भक्त आणि अध्यात्ममार्गातील उपासक. मैना आणि गोपाळ हे दोघेही एकाच प्रवृत्तीचे प्रेमी-वीर खरे तर विवाहबद्ध व्हायला हवे. पण मैनाचे वडील पैशासाठी हपापलेले. पैसे मिळण्याच्या लोभाने ते मैनेला म्हाताऱ्या जमीनदाराच्या गळ्यात बांधतात. मैनेच्या पुढच्या जीवनाची परवड कशी होते? गोपाळचे पुढे काय होते? हे रहस्य उलगडण्यासाठी ही कादंबरी मूळातूनच वाचायला हवी.

**सानेगुरुजींचे कथाविश्व**

कादंबरी हा प्रदीर्घ लेखनप्रकार आहे. त्यातून सानेगुरुजींच्या कादंबऱ्यांच्या बाबतीत तत्कालिन राजकीय आणि सामाजिक संदर्भ सतत येत राहतो. आजच्या सर्वच वाचकांना हे इतके सगळे वाचायला वेळ मिळेल आणि त्यात रस वाटेल का? अशी शंका कुणी उपस्थित केल्यास ते चुकीचे आहे असे म्हणता येणार नाही. पण त्यांच्या कथांचे मात्र तसे नाही. त्या चटकन वाचून संपण्यासारख्या आहेत. त्यात पुन्हा आजच्या वाचकानं सुद्धा आवडीनं वाचावं असं बरंच काही आहे. सानेगुरुजींनी मुलांसाठी म्हणून ज्या काही गोष्टी लिहिल्या त्यांची काही वैशिष्ट्ये सुरुवातीला आलेली आहेतच. पण त्याशिवाय अशाही बऱ्याच कथा आहेत की ज्या लहान आणि मोठ्या सर्वांनीच वाचाव्यात. या कथांमधून बालवाचकांचे मनोरंजन होते, आणि जाता जाता नकळत अनेक गोष्टी त्यांच्या मनावर ठसत जातात. प्रौढ वयातील वाचकांना तर त्यापलिकडे जाऊन आणखी काही खोलवर दडलेला अर्थही गवसतो. खरं तर यातील बहुतेक कथा सानेगुरुजींनी प्रत्यक्ष श्रोत्यांसमोर सांगितल्या आणि मगच त्या लिहून काढल्या. त्यांच्या मांडणीतून हा कथनियतेचा संस्कार सतत जाणवत राहतो. त्यात कोठेही पांडित्य प्रदर्शनाचा प्रकार नाही. वाचकाला काही तरी शिकवण्याचा अट्टाहास नाही. काही थोड्या कथा सोडल्या



अनुक्रमणिका






तर त्यात प्रचारकी थाटही नाही. छोटी छोटी अर्थपूर्ण वाक्ये आणि आता गोष्टीत पुढे काय याची उत्कंठा सतत लागावी अशा पद्धतीने केलेले लेखन ही तर त्यांच्या कथांची अगदी वरवर पाहता जाणवण्यासारखी वैशिष्ट्ये आहेत. आम्हाला गोष्टी सांगा म्हणून मुले सतत पालकांच्या मागे लागतात. सानेगुरुजींच्या कथा आजच्या पालकांनी वाचल्या तर त्यात मुलांना सहजपणे सांगता येण्यासारखं बरंच काही आहे, हे त्यांच्या लक्षात येईल.

**विविधतेतील सौंदर्य**

सानेगुरुजींचे कथाविश्व हे विविधतेने नटलेले आहे. त्यात लोककथा, पौराणिक कथा, दंतकथा, परीकथा, नीतीकथा असे निरनिराळे कथाप्रकार आहेत. त्रिचनापल्लीच्या तुरुंगात असताना सानेगुरुजींचा भारताच्या अन्य प्रांतातील राजबंद्यांशी संबंध आला. त्यांनी त्यातील काही भाषा शिकण्याचा प्रयत्न केला. पण त्या पलिकडे जाऊन त्या त्या भाषेतील वैशिष्ट्यपूर्ण कथा त्यांनी आत्मसात केल्या. त्याशिवाय इंग्रजी भाषेतील अनेक गोष्टी त्यांच्या वाचण्यात आल्या होत्या. 'जगात जेजे सुविचार वारे, मदीय भाषेत भरोत सारे' हा ध्यास त्यांना लागला होता. त्यांच्या गोड गोष्टीतील कित्येक गोष्टी या रूपांतरित आहेत. कदाचित या गोष्टी मूळातून कोणाच्या वाचनात आल्या तर त्यांना जाणवेल की रूपांतर करताना गुरुजींनी मूळ गोष्टीतील कथाबीजाचा नाममात्र आधार घेतला आहे, पण बाकी त्यांना हवे तसे त्यांनी या कथांवर संस्करण केले आहे. आशयाच्या दृष्टीनेसुद्धा या कथांमध्ये कुठेही एकसूरीपणा आढळत नाही. किंबहुना विविधतेनेच त्यांच्या गोष्टींना सौंदर्य प्राप्त झाले आहे. काही कथांच्या उदाहरणाने हा मुद्दा अधिक स्पष्ट होईल.

**पुराणकथांमधून नवीन आशय**

पुराणातल्या कथा आता जुन्या पुराण्या झाल्या. आजच्या काळात त्याचे काय? अशी अनेकांची ठाम समजून झालेली असते. पण पुराण कथांमधील आजच्या वाचकांसमोर नेमकेपणानं काय मांडायला हवं हे सानेगुरुजींना चांगल्या प्रकारे समजलेलं होतं. त्या कथा वाचत असताना आपल्याला असं वाटतं की या तर आपल्या अगदी परिचित अशा कथा, पण त्यातला हा अर्थ यापूर्वी आपल्याला माहित नव्हता. 'शबरीची बोरे' ही रामायणातील कथा लहानांपासून मोठ्यांपर्यंत साऱ्यांनाच माहित आहे. पण शबरीच्या पूर्वजीवनाबद्दल, तिच्या मनावर झालेल्या संस्कारांबद्दल फार थोड्यांना माहित असेल. मुळात ती भिल्ल राजाची कन्या. मतंग ऋषींच्या आश्रमात ती शिकली. त्यांच्या सहवासात राहून ती अंत:करणाने अत्यंत कोमल झाली. पशू-पक्षी, वृक्षवेली यांच्यावर प्रेम करू लागली. तिच्या विवाहाचा मंगल दिवस. त्या दिवशी पाहुण्यांच्या मेजवानीसाठी चारशे-पाचशे मेंढरांची हत्या होणार हे समजताच ती खडबडून जागी झाली. हे असले जीवन नको म्हणून ती विवाह मंडपातून पळाली आणि पुन्हा मतंग ऋषींच्या आश्रयाला आली आणि पुढे ती थोर तपस्विनी झाली. दधिची ऋषींच्या संबंधातील 'यज्ञ' नावाची कथा, 'त्यागाचे वैभव' ही लक्ष्मीच्या गर्वहरणाची कथा, या साऱ्या कथा अशाच सुपरिचित, वाचनीय आणि अर्थपूर्ण आहेत. गोड गोष्टींच्या दुसऱ्या भागात 'घामाची फुले' नावाची श्रमाची महती सांगणारी कथा ही सुद्धा अशीच बोलकी आहे. ऋषीकुमार मतंग

ऋषींच्या बरोबर जंगलात लाकडे तोडायला जातात, त्यांनी गाळलेल्या घामाची सुंदर आणि न कोमेजणारी फुले होतात ही कल्पनाच मोठी मोहक आहे. पुराणातील अनेक कथा या दंतकथा या सदरात मोडणाऱ्या असतात, पण त्यात संस्कार करण्याचे महान सामर्थ्य आहे.

**प्रेमाच्या धर्माची उपासना**

सानेगुरुजी हे खऱ्या अर्थाने ओळखले जातात, ते प्रेमाच्या धर्माचे उपासक आणि प्रसारक म्हणून. 'खरा तो एकची धर्म, जगाला प्रेम अर्पावे' ही त्यांची प्रार्थना तर अनेक शाळेतील मुलांपर्यंत पोचलेली आहे. सानेगुरुजींनी बहुतेक कथांमधून या प्रेमाच्या धर्माची महती गायल्याचे आढळते. 'आवडती-नावडती' या गोष्टीतील नावडती राणी ही दिसायला कुरूप म्हणून राजाच्या मनातून उतरलेली. सकाळपासून रात्रीपर्यंत तिच्या वाट्याला कष्ट, कष्ट आणि कष्ट. पुन्हा उठल्या बसल्या सतत घालून पाडून बोलणी. ती नावडती राणी म्हणते, 'माणसाला कष्टाचं काही वाटत नाही, पण कुणी तरी तू फार दमलीस बाई असं नुसतं प्रेमानं म्हटलं तरी पुरतं.' नावडत्या राणीच्या तोंडून गुरुजींनी निष्प्रेम जीवन ज्यांच्या वाट्याला आलेलं आहे, त्या दु:खितांच्या मनातील व्यथाच बोलून दाखवलेली आहे. 'अश्रूंचे तळे' या गोष्टीतील धर्मा भिकारी हा असाच कुणाचं प्रेम न लाभलेला अभागी जीव. गोपाळदास यांच्या लग्नघरातील उष्ट्या पत्रावळीतील अन्नाचा कणही त्याच्या वाट्याला येत नाही. उलट भिकाऱ्यांच्या भाऊगर्दीत त्याच्या वडिलांची प्रेमाची आठवण म्हणून कित्येक दिवस जपून ठेवलेले धोतराचे वस्त्र मात्र चोरीला जाते. रात्रभर तो तळ्याचे काठी दु:खातिशयाने अश्रू ढाळत बसतो. सकाळी त्या तळ्याच्या काठी त्याचा मृतदेह सापडतो. गोष्टीचा शेवट करताना गुरुजींनी वाक्य टाकले आहे, 'धर्माला या जगांत काही प्रेमाची भीक मिळाली नाही. परमेश्वराच्या घरी तरी अशी भीक त्याला मिळेल का?' गदाधराच्या मनातील दु:ख दूर करण्यासाठी स्वत:चा न्यायशास्त्रावरील अमूल्य ग्रंथ गंगेला अर्पण करणारे 'थोर त्याग' गोष्टीतील चैतन्य प्रभू, पाखरावर प्रेम करणारा 'पाखराची गोष्ट' या गोष्टीतील खंडू शेतकरी, चोरीचा आळ घेणाऱ्या जमीनदाराच्या पायातील सापाचे विष चोखून त्याला जीवदान देणारा विश्राम यासारखी अनेक उदाहरणे या संदर्भात सांगता येतील.

**मातृप्रेमाची महती**

मातृप्रेमाबद्दल खऱ्या अधिकारवाणीने लिहावे ते सानेगुरुजींनीच, अशी भावना मराठी वाचकांच्या मनात निर्माण व्हायला कारण ठरली ती त्यांची 'श्यामची आई'. याच पुस्तकावरून आचार्य अत्रे यांनी निर्मिलेला त्याच नावाचा चित्रपट राष्ट्रपतीपदक मिळवून अनेक मान्यवरांच्या गौरवास पात्र ठरला. त्यांनी लिहिलेल्या इतर पुस्तकांमधूनही मातृप्रेमाचा महिमा गायलेला आढळतो. 'अमोल गोष्टी' पुस्तकातील 'तरीही आई' नावाच्या कथेतील प्रेयसीच्या प्रेमापोटी पागल झालेला तरुण तिच्या मागणीवरून आईला ठार मारतो. आईचे काळीज घेऊन प्रेयसीला घाईघाईने भेटायला जातो. वाटेत त्याला ठेच लागते, त्याच्या हातातील काळीच पडते, पण त्या काळजातून आईचे शब्द उमटतात, 'बाळ तुला लागलं तर नाही ना?' ही कथा प्रत्यक्ष सानेगुरुजींच्या तोंडून ऐकण्याचे भाग्य ज्यांना लाभले ते उत्तमराव पाटील त्यांच्या 'क्रांतपर्व'

या पुस्तकात लिहितात, 'ही कथा मी सानेगुरुजींच्या तोंडून ऐकली आणि माझी आई माझ्या काळजात खोल रुतून बसली.' सानेगुरुजींच्या 'विश्राम' पुस्तकातील 'मोलकरीण' ही कथा चित्रपटाच्या माध्यमातून घराघरातून पोचली. कथेतील मुलाने कितीही झिडकारले, अपमानित केले, तरी त्याला दुरून तरी पाहता यावे म्हणून त्याच्याच घरी मोलकरीण होऊन राहिलेली एक लोकविलक्षण माता सुलोचनाबाईंनी त्यांच्या अभिनयकुशलतेने अजरामर करून ठेवली.

**आजच्या काळात सानेगुरुजींच्या कथांचे मोल**

आज काळ असा विचित्र आला आहे की सत्ता, संपत्ती, प्रतिष्ठा यात सारे काही आले असे आपला समाज मानू लागला आहे. या गोष्टी मिळवण्यासाठी माणूस कोणत्या थराला जाईल हे सांगता येत नाही. स्वराज्य मिळाल्यानंतर आमचा सारा प्रवास हा उलट्या दिशेने चालला आहे. अनाचार, दुराचार, अत्याचार, भ्रष्टाचार या साऱ्यांच्या भाऊगर्दीत सदाचार हा औषधासाठी तरी उरेल का नाही अशी चिंता विचारवंतांना आणि सर्वसामान्यांना लागून राहिली आहे. या दुरावस्थेतून आजची तरुण पिढी कशी वाचू शकेल हा खरा आपल्या देशासमोरील आजचा ज्वलंत असा प्रश्न आहे. अशा विचित्र काळाच्या संदर्भात नीतीमूल्यांची महती सांगणाऱ्या सानेगुरुजींच्या कथांचे मोल काय? यावर आमचे वाचक कधी विचार करतील का?

**सानेगुरुजींचे जिवंत स्मारक - कथामाला**

महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राच्या बाहेरही सानेगुरुजींचा सहवास लाभलेली, त्यांच्या गोष्टी ऐकून प्रेरित झालेली अनेक धडपडणारी मुले विविध क्षेत्रात सानेगुरुजींना आवडणारे कोणते तरी विधायक काम त्यांच्या मृत्यूनंतरही सातत्याने करीत राहिली. त्यापैकीच एक म्हणजे प्रकाशभाई मोहाडीकर, स्वराज्य मिळाल्यानंतर महाराष्ट्राच्या शाळा-शाळांमधून साने गुरुजींना न्यायचे, त्यांच्या तोंडून गोड गोष्टी साऱ्या महाराष्ट्रातील मुलांना ऐकवायच्या अशी योजना त्यांच्या मनात होती व त्या दृष्टीने गुरुजींशी बोलणे झाले होते. काही कार्यक्रमांची बोलणीसुद्धा झाली होती. पण दुर्दैवाने ती योजना प्रत्यक्षात येण्याचे भाग्य महाराष्ट्रातील मुलांच्या वाट्याला आले नाही. ११ जून १९५० या दिवशी वयाच्या अवघ्या पन्नासाव्या वर्षी सानेगुरुजींनी अकाली त्यांची जीवनयात्रा संपविली. त्यामुळे एका मौलिक अनुभवाला महाराष्ट्रातील मुले मुकली. पण सानेगुरुजींच्या मनातले हे अपुरे स्वप्न पुरे करण्याचा प्रकाशभाईंनी चंग बांधला. त्यांनी त्यांच्या स्वतःच्याच शाळेत म्हणजे सानेगुरुजी विद्यालय, दादर या ठिकाणी १९५१ मध्ये सानेगुरुजी कथामाला या अभिनव उपक्रमाची सुरुवात केली. त्यांना या उपक्रमात त्यांच्याच अनेक सुहृदांची साथ लाभत गेली. बघता बघता कथामालेची चळवळ महाराष्ट्रातील गावा-गावांमधून पसरत चालली. सानेगुरुजींना आवडणारे काम म्हणजे मुलांना गोष्टी सांगणे, तेच नेटाने पुढे चालवणे याचा वसा कथामालेने घेतला. एका लहानशा बीजाचा वटवृक्ष झाला. आजही ही संस्था कथाकथनाची प्रवृत्ती जिवंत ठेवण्यासाठी कार्यरत आहे. कथाकथनाच्या माध्यमातून मुलांचे भावविश्व फुलवावे असे ज्या पालक, शिक्षक किंवा सामाजिक कार्यकर्त्यांना वाटत असेल त्यांनी अधिक माहितीसाठी व मार्गदर्शनासाठी प्रस्तुत लेखकाशी संपर्क साधावा.



अनुक्रमणिका

**सानेगुरुजींच्या कथा आणि कादंबऱ्या**

(१) मुलांसाठी फुले (२) सुंदर कथा (३) सोनसाखळी (४) गोड गोष्टी (भाग १ त १०) (५) आवडत्या गोष्टी (भाग १ ते ६) (६) विश्राम (७) शबरी (८) दिगंबरराय (९) आस्तिक (१०) रामाचा शेला (११) सती (१२) संध्या (१३) धडपडणारी मुले (१४) क्रांती (१५) नवा प्रयोग (१६) पुनर्जन्म (१७) दिनबंधू (१८) तीन मुले (१९) अमोल गोष्टी (२०) त्रिवेणी (२१) श्रमणारी लक्ष्मी (२२) गोड शेवट (२३) कालिमातेची मुले (२४) चित्रकार रंगा (२५) श्यामची आई (२६) श्याम (खंड १) (२७) जीवन कलह : धडपडणारा श्याम (२८) जीवन विकास.

वरील पुस्तके पुढील पत्त्यावर उपलब्ध होतील ; विद्या एजन्सीज, ३८४ सदाशिव पेठ, नवी पेठ विठ्ठल मंदिराजवळ, पुणे ४११ ०३०. दूरध्वनी : ४३३४४८३ □

डॉ. अनिल गोडबोले

३७९ शनिवार पेठ, लिमये बिल्डिंग, ४ था मजला, पुणे ४११ ०३०. दूरध्वनी : ४४८१२९५

---

## स्वागत

- **झिंदाबाद मुर्दाबाद :** सैय्यद अल्लाउदीन, दिलजान प्रकाशन, अष्टी, पृष्ठे १३२
- **माझा विध्वंस करा :** गोकुळ वागल, कस्तुरी प्रकाशन, पृष्ठे १०४
- **अंतर्नाद :** अरविंद भुजबळ, उन्मेश प्रकाशन, पुणे, पृष्ठे ७५
- **यात्रिक :** अनिल पाटील, रूपबोध प्रकाशन, पृष्ठे ४५
- **रंग २ :** कमल देसाई, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १९१
- **एकता :** उत्तम कानिटकर, प्रकाशक श्री. व सौ. काते, एरंडवणे, पुणे, पृष्ठे ५६
- **भुकंप :** मंदाकिनी भारद्वाज, पुष्प प्रकाशन, पुणे, पृष्ठे २१५
- **नाती :** मंदाकिनी भारद्वाज, स्वप्न प्रकाशन, पुणे, पृष्ठे १९२
- **पेटंट फोर्स :** मंदाकिनी भारद्वाज, पुष्प प्रकाशन, पुणे, पृष्ठे ३९३
- **रिबेका :** मंदाकिनी भारद्वाज, पुष्प प्रकाशन, पुणे, पृष्ठे ४४५
- **शब्द मनातले :** अतुल देशमुख, ग्रंथविशेष प्रतिष्ठान, सातारा, पृष्ठे ५५
- **विरह :** सॅम्युअल सावर्डेकर, निशाद प्रकाशन, पुणे, पृष्ठे ५०
- **स्वरूप संप्रदाय :** मारुतीबुवा रामसादी, प्रकाशक मारुतीबुवा रामदासी, पृष्ठे ७८
- **वारणाकाठच्या कथा :** संपत पाटील, प्रकाशक मदन पाटील, पुणे, पृष्ठे १६०
- **औषधाविना स्वास्थ्यलाभ :** मधुकर विजापूरकर, मधुकर प्रकाशन, पुणे, पृष्ठे २०१
- **माध्यमाशी मैत्री :** वैद्यकीय, प्रयास प्रकाशन, पुणे
- **एच्. आय्. व्ही. एडस् म्हणजे काय :** वैद्यकीय, प्रयास प्रकाशन, पुणे
- **शहरचे दिवे :** वि. ग. कानिटकर, योगिता प्रकाशन, पुणे
- **नादब्रह्म :** सुजाता जोग, निहारा प्रकाशन, पुणे
- **कथारूप आणि आस्वाद :** डॉ. पंडित टापरे, निहारा प्रकाशन, पुणे
- **उध्वस्त पाखरे :** भगवान भोईर, स्वप्निल प्रकाशन, भिवंडी, पृष्ठे १३७
- **साहसी ठब्बू :** अनुराधा फाटक, मनोदय प्रकाशन, मुंबई, पृष्ठे २५

---



अनुक्रमणिका

ग. त्र्यं. माडखोलकर जन्मशताब्दी विशेष लेख

□

# कादंबरीकार माडखोलकर

□

डॉ. नीला पांढरे

विद्यार्थीदशेपासून माडखोलकरांच्या कादंबऱ्या आम्ही वाचत होतो. एम्. ए. ला चिपळूणकरांचा खास अभ्यास करावा लागला त्यावेळी त्यांचे 'विष्णु कृष्ण चिपळूणकर' हे पुस्तक संदर्भासाठी, उपयुक्त ठरले. प्राध्यापक झाल्यानंतर 'भंगलेले देऊळ' ही कादंबरी शिकवली. ७६ साली मला पीएच्.डी. मिळाली त्यावेळी माडखोलकर हे माझे बहिस्थ परीक्षक होते. अशा तऱ्हेने जवळजवळ २५-३० वर्षे माडखोलकरांशी संपर्क येत राहिला. त्यांच्या जन्मशताब्दी वर्षाच्या निमित्ताने त्यांच्या स्वातंत्र्यपूर्व काळातील कादंबरीवाङ्मयाचा धावता आढावा या लेखात मी घेणार आहे.

**बहुविध लेखन**

विदर्भातील रसिकांना माडखोलकर परिचित आहेत ते पत्रकार म्हणून, 'तरुण भारत'चे संपादक म्हणून. त्यांनी पन्नासाहून अधिक पुस्तके लिहिली-त्यामध्ये काव्य, समीक्षा, नाटके, कथासंग्रह, चरित्रे, व्यक्तिचित्रे, आत्मचरित्रपर लेखन, निबंधसंग्रह अशी विषयांची विविधता आहे. त्यांनी एकूण वीस कादंबऱ्या लिहिल्या. दहा स्वातंत्र्यपूर्व काळात १९३३ ते ४३ या दशकात आणि दहा स्वातंत्र्योत्तर काळात १९५० ते ७५ या काळात 'मुक्तात्मा ते अकेला' असा हा प्रवास आहे. त्यांनी अनेक साहित्यसंमेलनांची अध्यक्षपदे भूषवली. सन्माननीय अतिथी म्हणून इंग्लंड, अमेरिका, फ्रान्स इ. देशांना भेटी दिल्या — संयुक्त महाराष्ट्राच्या कल्पनेचे ते जनक होते — असे गौरवोद्गार मा. यशवंतराव चव्हाणांनी त्यांच्याबद्दल काढले होते. विदर्भातील अनेक साहित्यसंस्थांशी व सामाजिक संस्थांशी त्यांचा संबंध होता. साहित्य, समाजकारण व राजकारण या तिन्ही क्षेत्रात त्यांनी कार्य केले.

**चरित्रविषयक पार्श्वभूमी**

सावंतवाडीजवळचे 'माडखोल' हे त्यांचे मूळ गाव. मात्र भाऊसाहेबांचा जन्म व शिक्षण मुंबईतच झाले. त्यांचे वडील मुंबईच्या पाठारे प्रभु लोकांचे पौरोहित्य करत असत. त्यांची आईसुद्धा संस्कृत भाषा जाणत होती. शाळेत असताना त्यांना कीर्तनश्रवण, वाचन आणि काव्यलेखन हे छंद होते. मॅट्रिकमध्ये गणितात नापास झाल्यानंतर त्यांनी शिक्षणाचा नाद सोडला. त्यांचे शालेय शिक्षण आधुनिक पद्धतीच्या हायस्कूलपेक्षा संस्कृत पाठशाळेतून जास्त घडवले गेले. बऱ्याच अपत्यांपैकी जगलेले ते एकटेच अपत्य. त्यामुळे वडिलांच्या त्यांच्याकडून बऱ्याच अपेक्षा होत्या. भाऊसाहेबांनी वृत्तपत्रातून राजकीय व साहित्यविषयक लेखनाला प्रारंभ केला.



अनुक्रमणिका

पुण्यात वास्तव्य असताना ते तात्यासाहेब केळकर व तात्यासाहेब कोल्हटकर यांच्या संपर्कात आले. त्या दोघांना ते गुरू मानत असत.

पत्रकारिता करण्यासाठी ते १९२४ मध्ये नागपूरला आले आणि विदर्भातच स्थायिक झाले. विदर्भाने त्यांना घर, दार, पत्नी, कीर्ती, संपत्ती सारे काही दिले आणि माडखोलकरांनीही आपल्या साहित्यातून, विदर्भातील निसर्ग, माणसे, वैदर्भिय लोकांचे राजकारण, समाजकारण यांचे चित्रण करून, विदर्भाचे ऋण फेडले. पुण्यामुंबईला आणि महाराष्ट्रात त्यांनी वऱ्हाडच्या वैशिष्ट्यांचा परिचय करून दिला.

काही कविता आणि 'आधुनिक कविपंचक' व चिपळूकरांवरील समीक्षात्मक लेखन केल्यानंतर, अर्थप्राप्तीचे साधन म्हणून ते कादंबरीकडे वळले. ३४ साली, प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या 'मुक्तात्मा' कादंबरीचा उल्लेख 'मराठीतील पहिली राजकीय कादंबरी' म्हणून केला जातो. पण ते खरे नाही. हरिभाऊ आपटे यांच्या 'यशवंतराव खरे' या कादंबरीत व्यक्तिचित्रणाच्या पार्श्वभूमीसाठी प्रथमतः राजकीय पार्श्वभूमीचा वापर केला गेला. वा. म. जोशी यांच्या 'रागिणी'त (१९१५) राजकीय चर्चा आहे. डॉ. केतकरांच्या 'परागंदा (१९२६)' आणि 'आशावादी' (१९२७) या कादंबऱ्यांमध्येही राजकीय ध्येयवाद आणि सामाजिक उत्थान यासाठी प्रयत्न करणाऱ्या व्यक्ती आहेत. त्यांच्या लेखनात अनुभवांची विविधता असली तरी रूक्ष आणि खडकाळ भाषेमुळे त्या कादंबऱ्या लोकप्रिय झाल्या नाहीत. माडखोलकरांची भाषा लालित्यपूर्ण व संस्कृतप्रचुर असल्यामुळे, त्यांच्या कादंबऱ्या वाचनीय झाल्या आहेत. त्यांचे भाषेचे सौंदर्य आणि सामर्थ्य त्यांच्या संस्कृत साहित्याच्या व्यासंगात आहे.


**प्रा. डॉ. नीला पांढरे**
शिक्षण : एम्. ए., पीएच्. डी.
सध्या विद्यावर्धिनी महाविद्यालय, धुळे येथे मराठीच्या रीडर.
शि. म. परांजपे वाङ्मयीन अभ्यास प्रबंधावर आधारित ग्रंथ प्रकाशित
क्रांतिज्योती सावित्रीबाई फुले पुस्तिका दोन आवृत्त्या प्रकाशित.
माहेरच्या शैला कामत या नावाने लेखन प्रकाशित.
उत्तरायण या प्रवासवर्णनाला म. सा. प.चा दि. बा. मोकाशी पुरस्कार.
वादळ प्रीती, प्रीतीच्या फुला, वादळ ज्योत, चारित्र्यहीन, लव्हबर्डस्, अपराजिता, अभिसारिका या सात कादंबऱ्या शैला कामत या नावाने प्रकाशित.
पर्यटनावरील २२ पॉकेटबुक्स - उन्मेश प्रकाशन, पुणे यांनी प्रकाशित केली.
महाराष्ट्रात व महाराष्ट्राबाहेर स्त्री समस्यांवर व्याख्याने, वृत्तपत्रातून आणि नियतकालिकातून लेखन, प्रवासवर्णने व मुलाखती ही खासियत.


### कादंबऱ्यातील राजकारण

पारतंत्र्याच्या काळात जीवनाची अनेक अंगांनी कोंडी होते. साहित्यही त्याला अपवाद नाही. स्वातंत्र्यपूर्व काळात अनेक वृत्तपत्रे, पुस्तके, निबंध, कादंबऱ्या, नाटके - त्यातील

राजकीय विचारधारेमुळे जप्त झालेली दिसतात. ह्या कोंडीतूनच साहित्याचे नवे उन्मेषही व्यक्त होतात. 'काळकर्ते' शि. म. परांजपे ह्यांची वक्रोक्ती त्यातूनच जन्माला आली. पारतंत्र्याच्या काळात जनमानसावर राजकारणाचा मोठा पगडा असतो. त्यांची मने देशभक्तीच्या कल्पनांनी भारावलेली असतात. त्यांना राजकीय घटनांबद्दल कुतूहल असते. बुद्धिवादी लेखकही या आकर्षणापासून अलिप्त राहू शकत नाही. राजकीय विषयावरील लेखन यशस्वी होईल, असा त्याचा विश्वास असतो. एखाद्या लेखकाच्या प्रवृत्तीतच राजकारणाची आवड असते. माडखोलकरांमध्ये ती आहे. त्यामुळे त्यांच्या कादंबऱ्यांमध्ये राजकारण येते. परंतु ते उत्स्फूर्त न वाटता, ठिगळवजा वाटते. फार तर आपण असे म्हणू शकू की त्यांच्या साहित्याला राजकारणस्पर्श आहे. कलात्मकतेचा अभाव आणि प्रचारकी थाट यामुळे एकूणच मराठीतील राजकीय कादंबरीचा प्रवाह क्षीण आहे. वा. म. जोशी, खांडेकर इत्यादींच्या कादंबऱ्यातून गांधीवादी विचारसरणी आढळते, म्हणून त्यांना राजकीय कादंबऱ्या हे विशेषण लावता येणार नाही. तसेच माडखोलकरांच्याही कादंबऱ्यांना 'राजकीय'म्हणणे योग्य ठरणार नाही.

'मुक्तात्मा' कादंबरीत दहशतवादी चळवळीच्या प्राथमिक अवस्था व समाजवादी मनाची वाटचाल यांचे चित्र आढळते. तत्कालीन राजकीय वाद व सामाजिक प्रश्नांचे प्रतिबिंब आढळते. या पहिल्याच कादंबरीत क्रांतिकारकांबद्दलचे आकर्षण, तत्कालीन राजकीय वाद व सामाजिक प्रश्नांचे प्रतिबिंब आढळते. अनेक पात्रे व अनेक प्रश्न यांची गर्दी असल्यामुळे कादंबरी अकारणच पसरट झाली आहे. केशव आणि ललिता या चुलतभावंडांना परस्परांविषयी वाटणारे आकर्षण चित्रित करून कादंबरीला प्रारंभ केला आहे. तो भाग मनोविश्लेषणाच्या दृष्टीने चांगला साधला आहे. कादंबरीचा नायक असलेला चंद्रशेखर शंभर पानांनंतरच प्रवेश करतो. तो एका नायकिणीचा मुलगा. कॉलेजमधील विद्यार्थ्यांचा व प्राचार्यांचा लाडका. लोकमान्य टिळकांच्या उत्तुंग व्यक्तिमत्त्वाबद्दल त्याला आदर असला, तरी महायुद्धाच्या काळात लष्करभरतीला पाठिंबा देऊन त्यांनी तडजोडीची तयारी दाखवली, हे त्याला पसंत नाही. गांधीजी म्हणजे गोखले व टॉलस्टॉय यांच्या परस्परविरोधी मतांची भेसळ करणारा विक्षिप्त मनुष्य असे त्याचे मत आहे. तो स्वतः परागंदा झालेल्या वीरेंद्राचा अनुयायी व सहकारी आहे. पण त्याच्या हातून प्रत्यक्षात फार मोठे क्रांतिकार्य होत नाही. चळवळीच्या मुळाशी न जाता, ध्येयवादी विचार मांडण्यावर व वावदूकपणावरच त्याचा भर आहे. त्यामुळे त्याच्याबद्दल वाचकांना आत्मियता वाटत नाही. मुंबईतील दुसऱ्या काही गटांचे चित्रणही या कादंबरीत आले आहे. वृत्तपत्रीय आखाड्यातील जहाल-मवाळ संपादक, प्रो. राळे, शास्त्रीबुवा यांच्या व्यक्तिरेखा चांगल्या रेखाटल्या आहेत. क्रांतिकारकांच्या पोटात शिरून, त्यांची आतडी बाहेर काढणारा पाताळयंत्री अधिकारी-रावसाहेब भुजंगराव देशमुख यांची व्यक्तिरेखा अविस्मरणीय आहे.

'मुक्तात्मा' कादंबरी वेगवेगळ्या कारणांनी गाजली. समकालीनांपैकी फडके, खांडेकर, अत्रे ह्यांना ती आवडली नाही. पु. ल. देशपांडे ह्यांनी तर तिच्यावर एक

विडंबनात्मक लेख लिहिला. तात्यासाहेब कोल्हटकरांनी कादंबरीची रचना विस्कळीत आहे, भाषा वोजड आहे, अशी टीका केली. केळकरांनीही 'अशा संस्कृतप्रचुर क्लिष्ट भाषेत का कोणी कादंबरी लिहितात?' असा प्रश्न विचारला. बहुतेक टीकाकारांनी तिच्यातील प्रसंगचित्रण अवास्तव विपर्यस्त व विकृत आहे असे ताशेरे झोडले. नाही म्हणायला वा. म. जोशी ह्यांनी कादंबरीलेखनाचा पहिला प्रयत्न म्हणून कौतुक केले. कॉमरेड डांगे व बॅ. सावरकर ह्यांनी अनुकूल अभिप्राय दिले.

चंद्रशेखरला गोव्यातील नायकिणीचा मुलगा दाखवून, माडखोलकरांनी गोव्यातील कलावंताचा अपमान केला आहे असा आरोप करून गोव्यात व मुंबईत मराठा गोमंतकीय समाजाने त्यांचा निषेध केला. या कादंवरीत कम्युनिस्ट चळवळीची कुचाळकी केली आहे, असा आरोप झाला. सी. आयू. डी. तील निवृत्त अधिकारी गंगाधरराव देशपांडे ह्यांनी या कादंबरीत आपली बदनामी आहे- अशी नोटीस दिली. सकाळचे संपादक कै. नानासाहेब परुळेकर ह्यांनी माडखोलकरांची विस्तृत मुलाखत घेऊन, हे कुभांड निवारण्याचा प्रयत्न केला. मुंबईच्या 'विविधवृत्त' साप्ताहिकातून या कादंबरीचे व व्यक्तिशः माडखोलकरांचे विडंबन करणारी 'बद्धात्मा' ही कादंबरी क्रमशः सुरू करण्यात आली. त्या कादंबरीवर उतारा म्हणून 'पापात्मा' या संकल्पित कादंबरीची जाहिरात 'प्रतिभा' पाक्षिकातून करण्यात आली तेव्हा 'बद्धात्मा' हळुहळु माघार घेत नाहिसा झाला. हा सर्व इतिहास 'मी व माझे साहित्य' या ग्रंथात माडखोलकरांनीच सांगितली आहे.

**ग. त्र्यं. माडखोलकरांच्या कादंबऱ्या**

- मुक्तात्मा — १९३४
- भंगलेले देऊळ — १९३४
- शाप — १९३६
- कांता — १९३९
- दुहेरी जीवन — १९३९
- मुखवटे — १९४०
- नवे संसार — १९४१
- डाकबंगला — १९४२
- नागकन्या — १९४२
- चंदनवाडी — १९४३
- अनघा — १९५०
- स्वप्नांतरिता — १९५३
- अरुंधती — १९५६
- प्रमद्वरा — १९५९
- रुक्मिणी — १९५९
- उर्मिला — १९६३
- सत्यभामा — १९६८
- जन्मदुर्दैवी — १९७२
- रेणुका — १९७५
- अकेला— १९७५

राजकीय कादंवऱ्यांचा वेगळा गट करायचा असे ठरवले तर त्यामध्ये 'कांता', 'मुखवटे' 'नवे संसार', 'प्रमद्वरा' स्वप्नांतरिता', 'अनघा' यांचा समावेश करता येईल. या सर्व कादंबऱ्यांमध्ये सशस्त्र क्रांतिविषयीचे आकर्षण, हिंदुत्ववादी समाजवाद आणि महात्मा गांधी व गांधीवाद याविषयी अनादर, ही त्रिसूत्री आढळते.

'कांता' ही नागपूरच्या राजकीय व सामाजिक पार्श्वभूमीवर रेखाटलेली कादंबरी.

तिच्यामध्ये तीन पिढ्यांच्या राजकीय जीवनाचे व भावबंधांचे चित्रण आले आहे. एकीकडे यादवराव, सर महादेव ठाकूर यांची मावळती पिढी तर दुसरीकडे जयसिंग, उमाकांत इ. झपाट्याने पुढे जाऊ इच्छिणाऱ्यांची पिढी, यांच्या मध्यबिंदूवर कांता व प्रियदर्शन उभे आहेत. ते दोघे लहानपणापासून एकत्र वाढलेले, मैत्रीचे रूपांतर प्रेमात व विवाहात होते. परंतु 'कांता' संसाराच्या पलीकडे जाऊन प्रियदर्शनच्या राजकीय आकांक्षांशी समरस होऊ शकत नाही. प्रियदर्शनही त्यादृष्टीने फारसा प्रयत्न करत नाही. कांतेच्या व्यक्तिमत्त्वातील या प्रतिगामीपणामुळे ती सर महादेव ठाकुरांसारख्या मावळत्या पिढीच्या मनोवृत्तीशी अधिक समरस होते. सर महादेव ठाकुरांची करारी पण स्वाभिमानी वृत्ती, अधिकारीपणाची मिजास, त्यांचा समंजसपणा, बदलत्या राजकीय परिस्थितीमुळे झालेली निराशा — यांचे फार चांगले चित्र रेखाटले आहे. त्यांच्या आकस्मिक मृत्यूची घटना मात्र अक्षरश: गुंडाळली आहे. कांतेच्या मृत्यूने कादंबरीची अखेर होते — स्वामीजी व पंडितजींच्या व्यक्तिरेखांबद्दलचे आकर्षण 'शामासुंदरीच्या चित्रणात उमटलेले दिसते. लेखकाच्या मनात, नायकाच्या राजकीय विचारसरणीबद्दल आदर किंवा आत्मीयता नसल्यामुळे या कलाकृतीत जिवंतपणा येत नाही.

कांतेचाच उत्तरार्ध म्हणून लिहिलेल्या 'मुखवटे' कादंबरीत प्रियदर्शनची व्यक्तिरेखा अधिक सुस्पष्ट होते. प्रधानमंत्रीपदाच्या स्वीकारापासून ते त्याच्या राजकीय मृत्यूपर्यंतच्या घटना त्यात रेखाटलेल्या असून हे कथानक मध्य प्रांतातील गाजलेल्या डॉ. ना. भा. खरे प्रकरणावर आधारित आहे. प्रियदर्शनचा मराठी गट आणि महाकोशलचा हिंदी गट यांच्या संघर्षाचे चित्र तेथे आहे. प्रियदर्शनने गव्हर्नरच्या पार्टीचे निमंत्रण स्वीकारणे विरोधकांना 'अराष्ट्रीय कृत्य' वाटते. प्रियदर्शन मोर्चा, संप ह्यांना आत्मविश्वासाने तोंड देतो. त्याची गांधीजींवर श्रद्धा असते ते आपल्या पाठीशी उभे रहातील असा त्याला आत्मविश्वास असतो. परंतु अखेर त्याची कोंडी होती आणि तो मुख्य प्रधानकीची वस्त्रे उतरून ठेवतो. असे या कादंबरीचे कथानक आहे. डॉ. खरे ह्यांची अशीच ससेहोलपट झाली होती. त्यांची गांधीनिष्ठा व नंतरचा गांधींवरील राग दोन्ही प्रसिद्ध असल्याने मध्यप्रांतात ही कादंबरी गाजली. पण ती सामान्य वाचकांची पकड घेऊ शकली नाही. मोहन आणि रोज यांच्या आंतरधर्मीय प्रेमाची जोड देऊन माडखोलकरांनी कादंबरीत, शृंगाररस व करुणरस आणण्याचा प्रयत्न केला.

'नवे संसार' ही कादंबरी नावावरून संसारकथा वाटत असली तरी तिथेही राजकारण आले आहे. 'युद्धकाळात कादंबरी लिहायची आणि युद्धामुळे झालेला मनाचा क्षोभ जर तिच्यात व्यक्त करायचा नाही, तर कादंबरी लिहायचीच कशाला? असा प्रश्न त्यांनी पत्नीला विचारला होता. युद्धातील परिस्थितीचा सर्वसाधारण संसारावर काय परिणाम होतो हे इथे विद्याधर व मीरा यांच्या माध्यमातून व्यक्त केला आहे. विद्याधर हुषार, ध्येयवादी पण व्यवहारशून्य आहे. तो स्वयंकेंद्रितही आहे. आपण कर्तबगार असूनही आपल्या हुषारीचे चीज होत नाही. अशी विफलता त्याच्या मनात आहे. त्याची क्रांतिकार्याबद्दलची ओढ संशयास्पद वाटते.



अनुक्रमणिका

हेडमास्तरांशी न पटल्यामुळे तो राजिनामा देतो आणि लेखिका असलेल्या पण विरागी वृत्तीच्या मुक्ताकडे आकर्षित होतो आणि नंतर तर सशस्त्र क्रांतीवर विश्वास ठेवणाऱ्या दिनकर नावाच्या मित्रावरोवर डाक्यात भाग घ्यायला जातो असे कथानक आहे.

'प्रमद्वरा'— १९४२ साली ऑगस्टमध्ये राष्ट्रीय चळवळीचा डोंब उसळला, त्या ताज्या घटनांवर आधारित 'प्रमद्वरा' कादंवरी त्यांनी लिहिली. देहभान हरपून ऑगस्ट क्रांतीशी समरस झालेली प्रमद्वरा आणि तिचा अनुत्साही कम्युनिस्टधार्जिणा वकील नवरा यांच्या जीवनातील घटनांचे वर्णन तेथे आले आहे. सोजीरांच्या अत्याचाराच्या आणि जनतेच्या निधडेपणाच्या ऐकीव कथांचा त्यांनी वापर करून घेतला आहे. परंतु मुळामध्ये, लेखक काँग्रेसच्या कोणत्याही चळवळीशी समरस झालेला नसल्यामुळे कथानक निर्जीव व विस्कळीत वाटते. एखादी रोमांचक घटना, काही तुरळक संवाद यांनी कथानकामध्ये आकर्षकता आणण्याचा प्रयत्न केला आहे.

'अनघा' कादंबरीत गांधीवधानंतरच्या दंगलीची व जाळपोळीची जी हकीगत सांगितली आहे ती 'निर्वासितांची कहाणी'मध्ये अगोदरच आलेली आहे. कथेची नायिका 'अनघा' हिला टेनिसपटु दाखवून ती टेनिसमध्ये प्राविण्य मिळवण्यासाठी वाढत्या वयात परिश्रम करते व त्यामुळे आपण गर्भधारणेला अपात्र झालो आहोत असा तिचा समज होतो. या संदर्भातील चर्चेसाठी पानेच्या पाने खर्ची घातली आहेत - या कादंवरीत पचमढीचे वर्णनही आले आहे. (जे नंतर रुक्मिणी, सत्यभामा या कादंवऱ्यातही आढळते.)

'स्वप्नांतरिता' मध्ये राजीव व रंजना यांच्या प्रणयकथेला स्वातंत्र्योत्तर काळातील हैद्राबादमधील चळवळीचा भाग चिकटवला आहे. 'दुहेरी जीवन' आणि 'शाप' या कादंवऱ्यांमध्ये राजकारण आणि शृंगार हातात हात घालून चालताना दिसतात. लेखक आणि देशभक्त म्हणून प्रसिद्ध असलेला, पत्नीला आदर्श पती वाटणारा मुकुंद आपले जीवन दुहेरी कसे आहे याची हकीगत लिहून ते हस्तलिखित वाचण्यासाठी आपल्या पत्नीला देऊन परगावी जातो अशी कल्पना केली आहे. विद्यार्थीदशेत सुशीलकुमारसारख्या क्रांतिकारकामुळे राजकीय चळवळीशी संबंध ठेवू पहाणारा ध्येयवादी मुकुंद, कालांतराने संधिसाधु राजकीय नेता होतो. तारुण्याच्या उंबरठ्यावर 'शिरीन' या पार्सी तरुणीच्या वियोगाने दुखावून जाणाऱ्या मुकुंदाचे रूपांतर, सुलोचनेचा दुटप्पी पती आणि डॉ. क्षमेची वंचना करणारा प्रियकर यामध्ये कसे होते ही हकीगत त्यानेच आत्मकथनात्मक पद्धतीने सांगितली आहे. क्षमा गर्भवती राहिल्यानंतर विवाहाचे वचन देणारा मुकुंद तिला गर्भपाताचा सल्ला देतो. इतकेच नव्हे तर आपल्या वृत्तीचे समर्थनही करतो. 'मी काही एकटाच हिणकस नाही. या दुनियेत जगाच्या बाजारातील सगळीच नाणी हिणकस आहेत आपापल्या परीने.' असा त्याचा दावा आहे. आश्चर्य म्हणजे त्याची पत्नी सुलोचनाही आपल्या पतीच्या वागण्याचे समर्थन करताना दिसते. 'प्रौढ विवाहाच्या काळात अनेक तरुणतरुणी आर्थिक अडचणीमुळे तिशी ओलांडेपर्यंत लग्न करू शकत नाहीत. तिने अनाघ्रात, पुष्पाची अपेक्षा करणे असमंजसपणाचे नाही का











ठरणार?' असा तिचा प्रश्न आहे. या कादंबरीत क्रांतीवाद, समाजवाद इ. चर्चा आहेत. 'शाप' या छोट्या कादंबरीचा नायक निशिकांत हा प्रारंभी जंगलसत्याग्रह, बॉम्बफेक इ. चळवळीत सहभागी होतो. तुरुंगात लेनिन व मार्क्सची पुस्तके वाचून, त्याचे लक्ष समाजवादाकडे वळते, मात्र तो कृती न करता व्याख्यानेच देताना आढळतो. धरसोडीची वृत्ती असल्याने तो जी राजकीय वावटळ उठेल त्यात सामील होतो आणि नंतर पश्चात्ताप करतो. ध्येयवादाच्या ऊर्मीत तो सुहासशी लग्न करण्याचे नाकारतो. पण नंतर वासना काबूत ठेवता न आल्याने, लच्छीच्या — एका मोलकरणीच्या मादक सौंदर्याच्या मोहात पडतो. आपला हा अपराध तो सुहासला सांगून टाकतो. 'दुहेरी जीवन'च्या नायिकेप्रमाणे 'शाप'ची नायिका सुहास आपल्या प्रियकराच्या वर्तनाचे समर्थन करताना दिसते. 'माणसाला शरीराच्या गरजा दाबून ठेवता येत नाहीत; स्त्री, तिच्यावरील संस्कारांमुळे वासनांवर काबू मिळवते. पण पुरुष मात्र वाममार्गाने जातो' असे तिचे मत आहे. तिच्या ह्या विवेचनावर फ्रॉईडच्या मतांचा प्रभाव जाणवतो. नायकाने मोलकरणीवर प्रेम करण्यामध्ये आज निषिद्ध वाटण्यासारखे काही नसले तरी त्या काळात या कारणासाठी ह्या कादंबरीवर टीका झाली होती. राजकारणस्पर्श असलेल्या अनेक कादंबऱ्या माडखोलकरांनी लिहिल्या असल्या तरी समीक्षकांनी आपल्याला 'राजकीय कादंबरीकार' म्हणावे, असा त्यांचा मुळीच आग्रह नाही. उलट ते म्हणतात की — 'दवाखान्यात औषधे खलणाऱ्या कंपाऊंडरला जसे लोक डॉक्टर म्हणतात तसाच मला 'राजकीय कादंबरीकार' या लाभलेल्या पदवीचा प्रकार आहे.' मध्यप्रांतातील राजकारण्यांशी निकटचे संबंध असल्यामुळे आणि वृत्तपत्रव्यवसायामुळे, आपण वेगळ्या प्रकारच्या कादंबऱ्या लिहू शकलो असे ते सांगतात. आपल्या कादंबऱ्या गंभीर, विनोदविन्मुख आणि चिंतनशील आहेत असा त्यांचा दावा आहे.

### अश्लिलतेचा आरोप

राजकीय कादंबऱ्यांच्या संदर्भात हा दावा काही प्रमाणात सत्य असला तरी माडखोलकरांची ती एकमेव प्रवृत्ती आहे असे म्हणता येणार नाही. कारण त्याच माडखोलकरांवर अश्लिल कादंबऱ्या लिहिण्याचा आरोपही केला गेला आहे. डॉ. अ. ना. देशपांडे, कुसुमावती देशपांडे, डॉ. रा. शं. वाळिंबे, प्रा. रा. श्री. जोग, प्रा. नरहर कुरुंदकर अशा अनेक समीक्षकांनी माडखोलकरांच्या कादंबऱ्यांमध्ये स्त्रीसौंदर्याची व प्रणयलीलांची कामुक व वाचकांच्या वासना चाळवणारी वर्णने आहेत असा आरोप केला आहे. त्यासाठी उदाहरणे देताना, 'शाप' मधील लच्छीच्या कामप्रेरक अवयवांचे वर्णन, 'नागकन्ये'तील नग्न स्त्रीदेहाचे वर्णन, 'डाकबंगला' मधील रतिलाल आणि कांचनगौरी यांच्या कामचेष्टांचे वर्णन इ. संदर्भ दिले आहेत. प्रा. कुरुंदकर यांनी तर त्यांनी केलेली स्त्रीदेहाची वर्णने आणि ना. सी. फडके यांनी केलेली वर्णने यांची तुलना केली आहे. नारीदेहाच्या वर्णनात फडके सहसा गळ्याच्या खाली उतरत नाहीत. केस, नाक, डोळे, धनुष्याकृति भुवया असा त्यांचा खास प्रांत आहे. ते गळ्याखाली उतरलेच तर बांगडी, चोळी, पदर यांचे वर्णन करतात. गळ्याखालचा प्रांत खास

माडखोलकरांचा आहे. मात्र त्यांची स्त्रीदेहाची वर्णने एक छापाची आहेत. माडखोलकरांच्या कादंबऱ्यांतील, शृंगार दणकट व शरीरनिष्ठ असतो.

'संस्कृत काव्याच्या विशेषत: कुमारसंभवाच्या अभ्यासामुळे आणि शिवाच्या उपासनेमुळे आपण अशी वर्णने करण्यास प्रवृत्त झालो' असे माडखोलकरांचे म्हणणे असले तरी संस्कृत, महाकाव्यात प्रत्यक्ष भोगाच्या शारीरिक क्रियेची वर्णने करण्याची पद्धत नाही आणि महाकाव्यातील शृंगार सूचक व संयमित असतो. डॉ. वाळिंबे ह्यांचे यासंदर्भात म्हणणे असे की —— माडखोलकरांच्या कादंबरीतील उद्दीपक व उत्तेजक शृंगाराचे प्रसंग हे माडखोलकरांचे स्वप्नरंजन आहे.'

१९४६ साली वेळगाव येथे भरलेल्या मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून, माडखोलकरांचा परिचय करून देताना आचार्य अत्रे ह्यांनी 'दुहेरी जीवन' आणि 'नागकन्या' या कादंबऱ्यांच्या उल्लेख करून, 'माडखोलकरांचा शृंगार मोठा कडक असतो' असे विधान करून, हशा पिकवला होता. तर ना. सी. फडके ह्यांनी आपल्या 'झंकार' पत्रात 'माडखोलकरांची नाग(वी) कन्या' असा सणसणीत मथळा देऊन माडखोलकरांविरुद्ध आठ कॉलमी मजकूर लिहिला होता. मग मुंबईच्या साहित्यसंघाने आपल्या एका संमेलनात अभिरूप न्यायसभा भरवून माडखोलकरांना आरोपीच्या पिंजऱ्यात उभे करून, त्यांच्याविरूद्ध निकाल दिला होता.

'नागकन्ये'संबंधी बोलताना मामा वरेरकर एकदा म्हणाले होते की, 'भाऊसाहेब, तुम्ही ही कादंबरी मराठीत लिहिलीत ही चूक केलीत, तुम्ही जर ती संस्कृतमध्ये लिहिली असती तर टीकाकारांनी तिला डोक्यावर घेतली असती आणि प्रो. फडके ह्यांना संस्कृत येत नसल्याने तेही तिच्या वाट्याला गेले नसते. संस्कृतात ज्याचा शृंगार म्हणून उदो उदो होतो, ते प्राकृतात अश्लिल व ग्राम्य ठरते हे लक्षात आले नाही तुमच्या!

फडके आणि अत्रे ह्यांनी माडखोलकरांवर अश्लिलतेचा शिक्का मारल्यावर, इतर टीकाकारही वर्षानुवर्षे तो आरोप करीत आले आहेत. सामान्य वाचक मात्र या कादंबऱ्यांमधील शृंगारिक वर्णने आवडीने वाचत असत. शृंगाराला 'रसराज' म्हटले जाते. तो जर जीवनात आवश्यक आहे तर साहित्यात तो वर्ज्य का असावा? अशी वाचकांची भूमिका असावी.

देशकाल परिस्थितीनुसार नीतिअनीतीच्या कल्पना वदलत असतात. पूर्वी विशिष्ट शब्द, वाक्ये, प्रकरणे इतर कादंबरीपासून अलग करून ती अश्लिल आहेत अशी टीका करण्यात येत असे. आज त्या एकूण पुस्तकाच्या वाचकांच्या मनावर होणारा परिणाम लक्षात घेतला जातो. एखादे पुस्तक अश्लिल आहे म्हणून ओरडा झाला तर लोक त्याच्यावर वहिष्कार घालत नाहीत उलट त्याची मागणी वाढते. श्री. कृष्णराव मराठे यांच्या आग्रहाने पुण्यात 'अश्लिलता संशोधक समिती' स्थापन झाली होती. न. चिं. केळकर तिचे अध्यक्ष होते आणि द. वा. पोतदार व मराठे सचिव होते. कृष्णराव मराठे लोकांना भेटून त्यांना पुस्तके वाचायला देत आणि अमुक पानावरील मजकूर अश्लिल आहे की नाही याविषयी मत सांगा असा आग्रह करीत. नंतर ते अमुक कादंबरीतील अमुक पानावरील मजकूर अश्लिल आहे असे केसरीतून प्रसिद्ध

करू लागले. त्यामुळे लोकांना आयताच अश्लिल मजकूर वाचायला मिळू लागला. त्यांचा मुख्य हल्ला माडखोलकरांवर होता आणि त्यांचा त्याला काहीच आक्षेप नव्हता. कारण त्यामुळे लोकांचे लक्ष वेधले जाऊन कादंबऱ्यांचा खप वाढत असे.

सामान्यतः जी गोष्ट सभ्यतेला व सद्अभिरूचीला मारक ती अश्लिल असे आपण समजतो. पण कायदा तसे मानत नाही. कायद्याच्या दृष्टीने त्या पुस्तकाने लोकांच्या मनावर लैंगिक, विकृत परिणाम झाला तर ते पुस्तक अश्लिल समजले जाते. यादृष्टीने विचार केला तर, 'शाप', 'दुहेरी जीवन', 'डाकबंगला' या कादंबऱ्यांमध्ये काही अश्लिल आहे असे मला तरी वाटत नाही. 'शाप' आणि 'दुहेरी जीवन' मधील नायिका पुरुषांच्या अनैतिक वर्तनाचे समर्थन करताना दिसतात. 'भंगलेले देऊळ' मधील अनूसुद्धा 'प्रौढविवाहाच्या काळात अनाघ्रात पुष्पाची अपेक्षा करणे चुकीचे आहे' असे मत मांडते आणि पुरुषाच्या बहुपत्नीकत्त्वाला मान्यता देते. माडखोलकरांच्या नायिकांना दोन कामे करावी लागतात, नायकावर प्रेम करणे आणि त्याच्या लंपटपणाचे समर्थन करणे.

'डाकबंगला' ही छोटी कादंबरी सुटसुटीत व मनोरंजक आहे. त्यातले संवाद आकर्षक आहेत. नायिकेच्या वर्णनात स्त्रीदेहवर्णनावर भर न देता, तिचा पोषाख, दागिने यांच्या वर्णनावर भर दिला आहे. 'टेकड्या, तलाव, मंदिर, डाकबंगला, चांदणी रात्र अशी पार्श्वभूमी असल्याने निसर्गवर्णने आकर्षक आहेत. वातावरणनिर्मिती चांगली साधली आहे. फ्लॅशबॅक पद्धतीने सांगितलेल्या कांचनच्या कहाणीत तारुण्यसुलभ अवखळपणाने तिने रतिलालबरोबर डाकबंगल्यात जाणे, रतिलालने तिचा गैरफायदा घेणे, मग जबरदस्तीचे लग्न, अनिच्छेने लादलेले मातृत्त्व, पतिनिधनानंतर सासऱ्याची वाईट नजर - या सर्वांचा परिणाम होऊन तिच्यामध्ये निर्माण झालेले वैराग्य, प्रेमस्वरूप स्वामींची बुवाबाजी आणि संमोहनाचे प्रयोग यांचे गतिमान वर्णन आहे. तळ्यातील तिचा जलविहार रसिकतेने पण संयमाने वर्णन केला आहे. डाकबंगल्यात धनंजय या मुसाफिराशी भेट झाल्यानंतर, त्याने तिच्या हृदयाला हात घालताच, तिचा सारा संयम कोसळून पडतो आणि ती त्याला आपले शरीर अर्पण करते असे या कादंबरीचे कथानक आहे. अश्लिलतेचा आरोप असलेल्या या कादंबरीतील नायिकेचे वर्णनदेखील अश्लिल नाही. 'नागाच्या फणेसारखा केशबंध, मीनाकृति टपोरे डोळे, तन्वंगाला घट्ट लपेटून बसलेला जलवेष, हाताचे नाजुक लाल पंजे, तिची मोहकता, चपलता याबद्दल मत्स्यकन्येलाही मोह वाटला असता या वर्णनात अश्लिल काय आहे? कादंबरीतील शृंगाराच्या छटा गडद आहेत असे फार तर म्हणता येईल.

'नागकन्या' कादंबरीत प्रेमभंगाने पोळलेला व निराश झालेला तरुण 'रंगा' आपले दुःख विसरण्यासाठी धडपड करत असताना त्याला 'मदिया' ही गौरकाय तरुणी भेटते. त्याच्याबरोबर एक रात्र ती विलासात घालवते आणि जाताना त्याला 'दिव्य संदेश' देऊन जाते, अशी कथा आहे. मदिया आणि रंगा यांची भेट. परस्परांबद्दल वाटणारे आकर्षण, संभाषणातून दोघांचा इतिहास वर्णन करण्याचे कौशल्य यामुळे 'नागकन्या'

मनोरंजक झाली आहे. नायक व नायिका विवस्त्र होऊन जंगलातील डोहात रात्री जो जलविहार करतात, त्याच्या वर्णनावर अश्लिलतेचा आरोप करण्यात येतो. डोहात जलक्रीडा केल्यानंतर जमिनीवर आल्यानंतर एकमेकांच्या मिठीतून अलग होताना ते दोघे 'राजकीय चर्चा' करतात. माझ्या मते अशा शृंगारपूर्ण मनस्थितीत अशी चर्चा करणे हे मात्र अश्लिल आहे. बाकी कादंबरीतील निसर्गवर्णने आकर्षक आहेत आणि शृंगारवर्णनातही रसिकता व्यक्त झाली आहे.

एकीकडे अशी मादक वर्णने करत असतानाच दुसरीकडे 'प्रीती ही तारुण्यातील एक क्रीडा आहे आणि क्रीडा हे जीवनाचे सर्वस्व कधीच होऊ शकत नाही.' 'जीवन केवळ प्रणयलीलांसाठी व विलासासाठी नाही' असा तथाकथित बोध करण्याचा प्रयत्नही त्यांनी केला आहे. प्रा. मा. का. देशपांडे यांच्यासारखा समीक्षक ह्या बोधवाक्यांमुळे फसलेला दिसतो. माडखोलकरांच्या या शृंगारिक कादंबऱ्यांचा खप त्याकाळात चांगला झाला असला तरी आज त्या लोकप्रिय नाहीत. फडके, खांडेकर यांचे चाहते त्यांच्या कादंबऱ्या पुन्हापुन्हा वाचतात. तसे माडखोलकरांच्या कादंबऱ्यांचे झाले नाही.

'भंगलेले देऊळ' कादंबरी मात्र लोकप्रिय झाली. तिच्या अनेक आवृत्त्या निघाल्या. विद्यापीठाच्या अभ्यासक्रमात नेमली गेली (खुद्द माडखोलकरांना मात्र ती आवडत नव्हती) मुक्तात्मा च्या पाठोपाठ लिहिलेली ही कादंबरी स्त्रीसमस्याप्रधान आहे. अनूच्या प्रेमाला अरूपकडून प्रतिसाद मिळत नाही. त्यानंतर ती अनिरुद्धशी प्रेमविवाह करते. पण तोही सफल होत नाही. अनिरुद्धला ती 'नवपुष्पावरील भ्रमर' म्हणते, ते मात्र अयोग्य वाटते. कारण संसाराच्या प्रारंभी तो अनूची काळजी घेतो. वाळंतपणातही तिच्या प्रकृतीकडे दुर्लक्ष करत नाही. तीं आपल्या बालविधवा मामेवहिणीला 'मनू'ला घरी आणायचे ठरवते. तेव्हाही तो प्रथम विरोध करतो. तीन मुले झाल्यानंतर अनू समाजकार्यात गढून जाते. मनू आणि अनिरुद्ध परस्परांकडे आकर्षित होतात आणि अनूच्या वाट्याला परित्यक्तेचे जिणे येते. मात्र तरीदेखील घटस्फोट घ्यावा असे तिला वाटत नाही. उलट तिने असा संदेश दिला आहे की 'विवाहसंस्थेचे देऊळ भंगलेले असेल, भ्रष्ट असेल तर तुमच्या कल्पनेप्रमाणे त्याचा जीर्णोद्धार करा' पण ते अजिवात तोडून टाकून, मानवजातीच्या हातात स्वैराचाराची सनद मात्र देऊ नका.' स्त्रीचे समाजातील दुय्यम स्थान तिचे आर्थिक पारतंत्र्य, विवाहसंस्थेचे पावित्र्य घटस्फोटाची आवश्यकता अशा अनेक प्रश्नांना या कादंबरीने स्पर्श केला आहे. अनिरुद्ध आणि अनू ह्यांचे मनोविश्लेषणही चांगले साधले आहे. निसर्गवर्णने आणि मर्यादित पात्रे ह्यामुळे कादंबरीची आकर्षकता वाढली आहे. कादंबरीची भाषा संस्कृतप्रचूर असून मर्यादित प्रमाणात उपमा, उत्प्रेक्षांचा वापर केला आहे — 'तू स्वर्गात भराऱ्या मारणारा शेलेचा चंडोल आहेस' अशासारखा साहित्यातील व्यक्तींचा संदर्भ दिला आहे. 'प्रेम म्हणजे त्यागाचे मोल देऊन आवडत्या माणसावर मिळवलेली मालकी' अशी सुभाषितवजा वाक्ये पेरल्यामुळे भाषा कलात्मक झाली आहे. पात्रमुखी कथनतंत्रामुळे कादंबरी आटोपशीर झाली आहे. सावळी पण तरतरीत, बुद्धिमान,

अभ्यासू व रसिक 'अनू' त्याकाळात वाचकप्रिय झाली असली, तरी ती सनातनी, परिस्थितीशरण व परंपराप्रियच ठरते. प्राप्त परिस्थितीविरूद्ध बंड करण्याचा प्रयत्न ती करत नाही.

माडखोलकरांचा स्त्री जीवनाकडे पहाण्याचा दृष्टिकोन तसा अनुदारच आहे. सुशिक्षित स्त्रीचे जीवनही लाचारीचे, गुलामगिरीचे व असहायपणाचे आहे असे चित्रित करण्याचा त्यांचा प्रयत्न आहे. 'स्त्री ही पुरुषाच्या जीवनातील त्याच्या साहसी वृत्तीला पायबंद घालणारी शक्ती आहे' असे प्रियदर्शनला वाटते. 'नवे संसार' मधील विद्याधर मीरेच्या भावनांची पर्वा करत नाही. सुलोचना, अनू, कांचनगौरी यांचे पती मुकुंद, अनिरुद्ध व रतिलाल हे भोगलंपटच आहेत. माडखोलकरांच्या कादंबऱ्यात मध्यमवर्गीयांच्या चित्रणावर भर आहे.

ह्याला अपवाद फक्त 'चंदनवाडी'चा. या कादंबरीने साहित्याच्या मध्यमवर्गीय सीमा ओलांडल्या. कादंबरीच्या पूर्वार्धात ग्रामीण जीवनाचे चित्रण आहे तर उत्तरार्धात नागपुरातील गिरण्यांचा परिसर आणि ऊंटखान्याजवळील कंगालखाना याचे वास्तवपूर्ण चित्रण आहे. त्यामुळे ही कादंबरी एकदम नाविन्यपूर्ण वाटते. येसू देशमुख मूळची चंदनवाडीची मालकीण - नापिकी व कर्ज यामुळे तिला आपली वाडी देशपांड्यांना विकावी लागली. मुलाचा व नवऱ्याचा अकाली मृत्यु झाल्यानंतर ती व तिची तरुण सुन रखमा शेतमजुरी करून पोट भरत होत्या. चंदन ही तिची एकुलती एक नात. मालगुजार दादासाहेब देशपांड्यांची रखमावर वाईट नजर होती. पैसे भरले नाहीत म्हणून त्यांनी घरावर जप्ती आणली. तेव्हा येसू नागपूरला वहिणीकडे आली. सून गिरणीत कामाला लागली. ऊंटखान्याच्या गरीब वस्तीत भाड्याने जागा घेऊन तिघी राहू लागल्या. समोरच चर्च होते. चंदन त्या मिशनच्या शाळेत शिकली. हिरा नावाची महार जातीची मैत्रिण तिला मिळाली. तिच्या भावाचा मित्र अवधूत व चंदन परस्परांवर प्रेम करू लागले. योगायोगाने तो दादासाहेब देशपांड्यांचा मुलगाच निघाला. 'रखमा'ला त्यांचे प्रेम मान्य नव्हते. पण तरीही दोघांनी लग्न करायचे ठरवले. लग्नाच्या आदल्या रात्री ते एकत्र आले आणि लग्न लागण्याच्या अगोदरच चळवळीतील कार्यामुळे अवधूतला अटक झाली. चंदनला दिवस गेल्याचे लक्षात आल्यानंतर तिच्या आईने गावठी औषध देऊन तिचा गर्भपात करण्याचा प्रयत्न केला, पण त्या प्रयत्नात चंदनचा बळी गेला. अशी या कादंबरीची कथा आहे. कादंबरी स्त्रीव्यक्तिरेखाप्रधान असून चंदन, रखमा, येसू या तिघींच्या व्यक्तिरेखा चांगल्या साधल्या आहेत. त्याशिवाय जिच्या सहकार्याने व प्रेरणेने चंदन शिक्षण घेऊ शकते, त्या खिश्चियनाची व्यक्तिरेखा अत्यंत आकर्षक झाली आहे. कोणताही स्वार्थ नसताना चंदनवर अपत्यवत् प्रेम करणारी, तिला मार्गदर्शन करणारी ही सिस्टर म्हणजे आदर्श खिस्ती मिशनरी स्त्री आहे. कादंबरीच्या निमित्ताने खिस्ती मिशनऱ्यांचे कार्य, हिंदुस्थानातील अस्पृश्यता, काँग्रेसचे मुस्लीमधार्जिणे धोरण, ४२च्या चळवळीतील स्थिती अशा अनेक गोष्टींची चर्चा झाली आहे. माडखोलकरांनी वर्णन केलेल्या खिस्ती मिशनच्या कार्यामुळे अनेक मिशनरी त्यावेळी प्रभावित झाले होते. फादर

डॉ. गाये ह्यांनी चंदनवाडीच्या गुजराथी आवृत्तीला इंग्रजी प्रस्तावना लिहिली होती. या कादंबरीचे फ्रेंचमध्ये भाषांतर व्हावे म्हणून त्यांनी केलेले प्रयत्न मात्र त्यांच्या निधनामुळे अपुरेच राहिले.

या कादंबरीला राजकारणस्पर्श झाला असला तरी तिचे सामर्थ्य मात्र तिच्यातील ओजस्वी विचारात नाही तर सूक्ष्म व्यक्तिदर्शनात आहे. मुख्य पात्रांचेच नव्हे तर मालगुजार दादासाहेब, आंधळा कुबडा भिकारी दशरथ, अवधूतचा दलित मित्र अभिमन्यु आणि मुस्लिम मित्र सिराज या दुय्यम व्यक्तिरेखांचे चित्रणही चांगले साधले आहे. कादंबरीची भाषाही साधीसोपी, नागपूरकडील कामगार-मजूर बोलतात, तशा प्रकारची आहे. या कादंबरीतून त्यांनी खऱ्या अर्थाने विदर्भाचे चित्रण केले.

१९६० च्या आसपास माडखोलकरांनी 'रुक्मिणी', 'उर्मिला' व 'सत्यभामा' या तीन कादंबऱ्यातून नागपूर प्रांतातील जुन्या प्रतिष्ठित वर्गाचा होणारा ऱ्हास चित्रित केला — जुन्या मध्यप्रदेशातील मिश्र राजकारण, संस्थानी वातावरण, पंचमढीतील वैभवसंपन्न वातावरण यांचे चित्रण त्यात आले आहे. स्थलकालमर्यादा लक्षात घेऊन त्यांची विस्तृत चर्चा मी टाळली आहे.

माडखोलकरांच्या कादंबऱ्या फडके-खांडेकरांप्रमाणेच मनोरंजनात्मक आहेत. त्यात कोणतीही नवी जाणीव नाही. मराठी कादंबरीच्या प्रवाहात त्यांनी एखाद्या नव्या गोष्टीची भर घातली नसली तरी आपली अनुभवसमृद्धता, राजकारणाचा अभ्यास, सूक्ष्म निरीक्षण आणि भाषाप्रभुत्त्व यामुळे त्यांच्या काळातील कादंबरीकारांमध्ये ते लोकप्रिय झाले व त्यांनी वाचकांचे मनोरंजन केले. हे ऐतिहासिक कार्य महत्त्वाचे आहे.

□

डॉ. नीला पांढरे
मैफल, साक्री रोड, धुळे ४२४ ००१.

## स्वागत

- **मला समजलेली गीता** : रा. रा. जांभेकर, उत्कर्ष प्रकाशन, पुणे, पृष्ठे २३८
- **चित्पावन** : पुरुषोत्तम धाक्रस, उत्कर्ष प्रकाशन, पुणे पृष्ठे २१०
- **फायनल डायग्नॉसिस** : अरुण मांडे, उत्कर्ष प्रकाशन, पुणे, पृष्ठे २५३
- **मुठे लोकमाते** : य. दि. पेंढरकर, रविकिरण प्रकाशन, पुणे, पृष्ठे ४५
- **मराठी गजलेशी बंदिश** : मिरदेव गायकवाड, नवीन उद्योग प्रकाशन, पुणे, पृष्ठे १२०
- **प्रशासनाचे पैलू (खंड १)** : माधव गोडबोले, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे २०५
- **साहित्य संस्कृती** : सुभाष भेंडे, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे ३११
- **हसरे चेहेरे** : शामकांत गोखले, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे ११३
- **पुणे विद्यापीठाचा इतिहास** : राजा दीक्षित, पुणे विद्यापीठ प्रकाशन, पुणे, पृष्ठे २१०
- **कदाचित्** : अरुण हरकारे, चंद्रमौळी प्रकाशन, पुणे
- **नगराध्यक्ष** : अशोक उधापूरकर, पवन प्रकाशन, परभणी, पृष्ठे ११६
- **कविता लहानपणाच्या** : केशव वसेकर, प्रतिभास प्रकाशन, परभणी, पृष्ठे ३२
- **वानवळा** : रा. रं. बोराडे, प्रतिभास प्रकाशन, परभणी. पृष्ठे १३१



अनुक्रमणिका

# कवी कुसुमाग्रज आणि यशवंत काव्यस्पर्धेच्या निमित्ताने

□

डॉ. राजा दीक्षित

महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे दिल्या जाणाऱ्या काव्यविषयक दोन महत्त्वपूर्ण पारितोषिकांसाठीच्या परीक्षक-समितीचा एक सदस्य म्हणून डॉ. अरविंद वामन कुलकर्णी आणि डॉ. वीणा देव (निमंत्रक) यांच्यासह मी यंदा काम पाहिले. या स्पर्धांसंदर्भातील काही माहिती व निरीक्षणे प्रस्तुत लेखाद्वारे सादर करीत आहे.

**आजवरची वाटचाल**

उत्कृष्ट काव्यसंग्रहासाठीचे 'कवी कुसुमाग्रज पारितोषिक' (कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत) १९८६ पासून देण्यात येऊ लागले. कुसुमाग्रज (१९१२-१९९९) यांची मराठी साहित्यक्षेत्रातील थोरवी सर्वमान्य आहे. १९३१-३२ च्या सुमारास उदयास आलेली त्यांची कविता हा रविकिरण मंडळ आणि मर्ढेकर यांच्यामधील अर्थपूर्ण टप्पा ठरला. एकदंरीतच आधुनिक मराठी काव्यप्रवाहात कुसुमाग्रजांची कविता मध्ववर्ती ठरली आहे. केशवसुत ते साठोत्तरी कविता या प्रवासात केवळ कालिक दृष्ट्या नव्हे, तर विविध अर्थांनी तिचे हे मध्यवर्ती स्थान जाणवण्याजोगे आहे. त्याबाबतची चर्चा येथे अभिप्रेत नाही. पण सूत्ररूपाने एवढेच नमूद करावेसे वाटते, की मराठी वाङ्मयाकाशात कुसुमाग्रजांच्या 'विशाखा नक्षत्रा'ला अढळ स्थान प्राप्त झाले आहे. या थोर कविविषयीचा आदरभाव व्यक्त करण्यासाठी त्यांच्या प्रकाशक मित्राने १९८५ साली दुर्लभ योजकता दाखवली. 'कॉन्टिनेन्टल प्रकाशन'चे अनंतराव कुलकर्णी यांनी म. सा. प.ला पंचवीस हजार रुपयांची उदार देणगी दिली. या निधीतून १९८६ पासून 'कवी कुसुमाग्रज पारितोषिक' दिले जाऊ लागले. कवितासंग्रह प्रकाशित करणे हे एक धाडसच ठरावे अशी परिस्थिती प्रकाशन-क्षेत्रात आहे ! त्यामुळे कवीप्रमाणेच कविता संग्रहाच्या प्रकाशकालासुद्धा पारितोषिक देण्याची तरतूद हे या योजनेचे खास वैशिष्ट्य म्हटले पाहिजे.

'कवी कुसुमाग्रज पारितोषिक' प्राप्त करणाऱ्या कवींमध्ये अनुराधा पाटील ('तरीही', १९८५), श्रीधर शनवारे ('थांग अथांग', १९८६), वाहरू सोनवणे ('गोधड', १९८७), अश्विनी धोंगडे ('स्त्री सूक्त', १९८८), अनुराधा पोतदार ('मंझधार', १९८९), शांता शेळके (जन्मजान्हवी', १९९०), भालचंद्र नेमाडे ('देखणी', १९९१), दिलीप पुरुषोत्तम चित्रे ('एकूण कविता : खंड १', १९९२), रजनी परुळेकर ('स्वीकार', १९९३), अरुणा ढेरे ('निरंजन', .१९९४), आनंद जोर्वेकर ('काहिलीचे पाणी', १९९५), दिलीप कुलकर्णी ('एका अस्वस्थ वळणावर', १९९६), सतीश काळसेकर ('विलंबित', १९९७) यांचा समावेश आहे.

कुसुमाग्रजांच्या जन्मदिनी (२७ फेब्रुवारी) म्हणजेच 'मराठी जागृती दिनी' आदल्या वर्षीच्या उत्कृष्ट काव्यसंग्रहासाठी हे पारितोषिक दिले जाते. यंदा सय्यद अल्लाउद्दीन यांना त्यांच्या 'झिंदाबाद मुर्दाबाद' या कवितासंग्रहासाठी १५०० रुपयांचे, तर संग्रहाच्या प्रकाशिका सय्यद बेबीबानो स. अल्लाउद्दीन यांना १००० रुपयांचे पारितोषिक देण्यात आले. कविवर्य कुसुमाग्रजांच्या हयातीतील हे शेवटचे 'कुसुमाग्रज पारितोषिक' होय.

उत्कृष्ट काव्यसंग्रहासाठीचे 'महाराष्ट्र कवी यशवंत पारितोषिक' १९८८ पासून देण्यात येऊ लागले. कवी यशवंत (१८९९-१९८५) हे महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनावर छाप उमटवणाऱ्या 'रविकिरण मंडळा'तील एक श्रेष्ठ कवी. 'सुधारणांचे युग' आणि 'साधारणांचे युग' अशी टोकाची वर्णने रविकिरण मंडळाच्या पदरी आली, यातच मराठी काव्यविश्वातील महत्त्वपूर्ण चर्चाविषय म्हणून असणारे त्याचे स्थान स्पष्ट होते. या मंडळातील 'महाराष्ट्रकवीं'च्या 'यशोधना'चे मोल मराठी साहित्याच्या क्षेत्रात फार मोठे आहे, यात शंकाच नाही. पेंढरकर कुटुंबियांच्या वतीने कवी यशवंतांच्या भगिनी प्रा. काशीताई पेंढरकर यांनी १९८७ साली म. सा. प.ला नऊ हजार रुपयांची देणगी दिली आहे. या निधीतून 'कवी यशवंत पारितोषिक' दिले जाऊ लागले.

'महाराष्ट्रकवी यशवंत पारितोषिका'च्या मानकऱ्यांमध्ये अरुणा ढेरे ('यक्षरात्र', १९८७), अरुण शेवते ('राजघाट', १९८८), सुधांशु ('यात्री', १९८९), ना. धों. महानोर ('प्रार्थना दयाघना', १९९०), जोगिन्दर कौर महाजन ('रुंद-अरुंद', १९९१), गोविंद कुलकर्णी ('तीन रंगांचे इंद्रधनुष्य', १९९२), फ. मुं. शिंदे ('निरंतर', १९९३), नरेंद्र बोडके ('शुकशकुन', १९९४), अंजली कुलकर्णी ('मी : एक स्त्रीजातीय अस्वस्थ आत्मा', १९९५), ह. शि. खरात ('गोची', १९९६), प्रकाश होळकर ('कोरडे नक्षत्र', १९९७) यांचा समावेश आहे. हे पारितोषिक कवी यशवंतांच्या जन्मदिनी (९ मार्च) आदल्या वर्षीच्या उत्कृष्ट संग्रहासाठी देण्यात येते. यंदा वृषाली किन्हाळकर यांना त्यांच्या 'वेदन' या संग्रहासाठी १००१ रुपयांचे पारितोषिक देण्यात आले. कवी यशवंतांच्या जन्मशताब्दी दिनी (९ मार्च, १९९९) त्यांच्या नावाचे पारितोषिक स्वीकारण्याचे भाग्य या कवयित्रीला लाभले.

दोन्ही स्पर्धांच्या आजवरच्या विजेत्यांची नावे व त्यांचे संग्रह लक्षात घेतले, तर गेल्या सुमारे दीड दशकातील मराठी कवितेचे प्रातिनिधिक दर्शनच त्याद्वारे घडू शकते. या मानकऱ्यांमध्ये प्रस्थापित आहेत, तसेच नवोदित आहेत. प्रदेश, समाज-गट, लिंग, साहित्य-प्रवाह अशा संदर्भांमधील विविधता त्यांमध्ये आढळते. ग्रामीण, दलित, आदिवासी, स्त्रीवादी, महानगरीय इत्यादी विविध प्रकारच्या संवेदना मराठी कवितेत जोरकसपणे उफाळून येत असल्याचे आणि मराठी कवितेचा पल्ला विस्तारल्याचेही जाणवते. सौंदर्यवादापासून अस्तित्ववादापर्यंतच्या विविध छटा काव्यक्षेत्रात आज कशा उमटत आहेत, याची कल्पना येऊ शकते. सर्व संग्रहांचा एकत्रित विचार करून ठोस निष्कर्ष मांडणे येथे अभिप्रेत नाही. या लेखाच्या मर्यादेत ते शक्यही नाही. यंदाच्या स्पर्धांविषयीची काही निरीक्षणे मात्र संक्षिप्तपणे नोंदवत आहे.

**यंदाच्या मानकऱ्यांचे संग्रह**

१९९९ मधील पारितोषिकांसाठी परीक्षक-मंडळाने दोन टप्प्यांमध्ये परीक्षण केले. पहिल्या वाचनानंतर उल्लेखनीय वाटलेले निवडक कवितासंग्रह बाजूला काढले. अंतिम निर्णय घेताना या निवडक संग्रहांचा पुन्हा विचार करण्यात आला. एकमताने आणि शक्य तेवढ्या वस्तुनिष्ठपणे हे काम करण्याचा प्रयत्न केलेला असला, तरीही या प्रकारच्या निवडीत व्यक्तिसापेक्षता स्वाभाविक असते. त्यामुळे स्पर्धेतील कवींनी ही निवड म्हणजे यशापयशाचा मापदंड मानू नये आणि निकालाविषयी अतिसंवेदनाशील राहू नये, असे वाटते. किंबहुना कोणत्याही वाङ्मय-पुरस्कारांना हे लागू पडते. या संदर्भात कुसुमाग्रजांच्याच काव्यपंक्ती विशेष उद्बोधक आहेत :

'विजयासाठी कविता माझी कधीच नव्हती
म्हणून नव्हती भीती तिजला पराजयाची
जन्मासाठी हटून केव्हा नव्हती बसली
म्हणून नाही खंतही तिजला पराजयाची.'

मराठवाड्यातील मुर्शदपूरचे प्रा. सय्यद अल्लाउद्दीन यांच्या 'झिंदावाद-मुर्दावाद' या कवितासंग्रहाला (दिलजान प्रकाशन, मुर्शदपूर, जिल्हा बीड) 'कुसुमाग्रज पारितोषिक' देताना त्यांच्या कवितेतील सामाजिक भान लक्षात घेतलेले आहे. त्यांचा संग्रह म्हणजे सामाजिक आशयाचा उत्कट काव्याविष्कार आहे. समकालीन सामाजिक अंत:सत्त्वाच्या व्यमिश्रतेचा वेध घेण्याचा प्रयत्न कवीने केलेला आहे. फाळणी, दंगली, भूकंप अशा घटनांच्या किंवा येशू खिस्त, महात्मा गांधी, नारायण सुर्वे अशा व्यक्तींच्या निमित्ताने कवी कठोर सामाजिक वास्तवाकडे आणि काही श्रेष्ठ व शाश्वत मूल्यांकडे पोहोचतो. विषमता, शोषण, भ्रष्टाचार, हिंसाचार यांनी झाकोळलेले वास्तव त्याला अस्वस्थ करते आणि त्यांच्या संवेदना उत्कट काव्यरूप धारण करतात.

*'शाईच्या डोहात । शब्द ठार मेले*
*खोपडीचे झाले । भयालय''*

अशा ओळींद्वारे याची प्रचीती येते. अभंग, गझल, मुक्तछंद अशा विविध घाटांमधून कवीची उत्कटता आविष्कृत होते. अर्थात आविष्काराच्या सफाईबाबत कवीकडून अधिक अपेक्षा आहेत. संग्रहगत कवितांची निवडही अधिक चोखंदळपणे करणे आवश्यक होते. संग्रहाच्या 'प्रस्तावने'त त्याच्या सामर्थ्य-मर्यादांची मार्मिक चर्चा प्रा. मधु जामकर यांनी केलेली आहे. कवीची कविता 'पांगूळगाडा घेऊन चाचपडत आलेली' असल्याचे त्यांनी जसे नमूद केले आहे, तशीच 'स्वयंभू वाटचाली'च्या तिच्या क्षमतांचीही नोंद घेतलेली आहे. 'कुसुमाग्रज पारितोषिका'साठी संग्रहाची शिफारस करताना परीक्षकांनीसुद्धा या क्षमतांची दखल प्राधान्याने घेतलेली आहे. संग्रहात सुरुवातीला कुसुमाग्रजांच्या हस्ताक्षरातील शुभेच्छा छापलेल्या आहेत. या शुभेच्छा त्यांच्याच नावाच्या पारितोषिकाच्या रूपाने फलद्रूप झाल्या, हा मणिकांचन योग म्हटला पाहिजे.

नांदेड येथील डॉ. सौ. वृषाली किन्हाळकर यांच्या 'वेदन' या कवितासंग्रहाला (शब्दालय

प्रकाशन, श्रीरामपूर) यंदाचे 'महाराष्ट्रकवी यशवंत पारितोषिक' देण्यात आले. हा संग्रह त्यातील चिंतनशीलतेच्या संयत भावाविष्कारामुळे उल्लेखनीय वाटला. प्रेमाच्या, विरहाच्या, प्रतीक्षेच्या, साफल्याच्या, अपेक्षाभंगाच्या गहिऱ्या छटा त्यांच्या कवितेतून व्यक्त होतात. अंतर्मुखता हा त्यांच्या कवितेचा स्थायीभाव आहे. सूक्ष्मता व नजाकत हे या अंतर्मुख असलेल्या कवितांचे वैशिष्ट्य म्हणता येईल. केवळ एकेका शब्दाच्या ओळी असलेला रूपबंध, हे त्यांच्या शैलीचे एक उल्लेखनीय वैशिष्ट्य. पाऊस बरसून गेल्यावर ओल्याशार हिरवाईला उन्हामुळे झळाळी यावी आणि एखाद्या पानाच्या पन्हाळीतून पाण्याचा एकेक प्रकाशमान थेंब निथळत राहावा, तशी त्यांच्या या रूपबंधातील कविता वाटते.

'माझ्या डॉक्टरी शरीराच्या आत एक माऊली आहे' असे कवयित्री एका कवितेत म्हणते. किंबहुना तिचा तो स्वभावधर्म आहे. त्यामुळेच तिची मुक्तीची कल्पना ठाम असली, तरी आक्रस्ताळी नाही. 'तव्यावरच्या भाकरी सबे चटके खाणारे हात' आता कॉम्प्युटरच्या की-बोर्डवर आणि कारच्या स्टिअरिंगवर सराईतपणे फिरू लागल्याचे वास्तव कवयित्री नमूद करते.

*'वर्षानुवर्षं दबलेल्या तिच्या ओठाच्या कोपऱ्यात*
*एक मोकळे स्मित जन्मते'*

अशा संयत सुरातून कवयित्री खूप काही सूचित करते. तिच्या कवितांमध्ये तत्त्वज्ञान सांगण्याचा आव नाही, विद्रोहाचा अभिनिवेश नाही, आक्रस्ताळी आदळआपट नाही. एखादेवेळी ही मूळ प्रकृती सोडून जेव्हा ही कविता आकार घेऊ पाहते, तेव्हा मात्र तिची काव्यात्मकता घटते. परंतु असे अपवाद वगळता 'वेदन' हा संग्रह एक सुखद काव्यानुभव देतो आणि कवयित्रीच्या भावी प्रगतीची दिशाही सूचित करतो.

**यंदाची स्पर्धा आणि मराठी कविता**

यंदाच्या स्पर्धांसाठी परीक्षण करताना काही गोष्टी प्रकर्षाने जाणवल्या. प्रकाशित होणाऱ्या कवितासंग्रहांची संख्या वाढत चालली आहे. (त्यामुळे परीक्षकांच्या सहनशीलतेचीही चांगलीच परीक्षा पाहिली जाते !) वास्तविक कवितासंग्रह या ग्रंथप्रकाराला फारसा ग्राहक व 'बाजारभाव' नाही. मोठ्या कवींचे काही तुरळक अपवाद वगळता कवितासंग्रहाची एखादी आवृत्ती खपणे हीसुद्धा जिकिरीची गोष्ट असते. तरी कवितासंग्रहांची संख्या वाढत जावी, हा विकास समजायचा की सूज? संख्या आणि गुणवत्ता यांच्यातील व्यस्तता लक्षात घेता या वाढीला सूजच म्हटले पाहिजे. बहुतांश कवितासंग्रहांचे प्रकाशन हा 'हौसेला मोल नाही' या सदरातला प्रकार असतो. त्यामुळे प्रकाशक व कवी यांच्यापैकी कोणी कोणाला मानधन द्यायचे याचे गणित उलटे झाल्याची अनेक उदाहरणे ऐकिवात येतात. कवितासंग्रह प्रकाशित होण्याबाबतचा उथळ उत्साहीपणा वाढत चालल्याचे हे संग्रह वाचताना स्पष्टपणे जाणवले. प्रा. रा. ग. जाधव यांचा शब्दप्रयोग वापरायचा तर सध्याचा कालखंड हा 'झटपट-संवेदनशीलते'चा कालखंड आहे. काव्यविषयक सूज पाहून त्याची प्रचीती येते.

१९९८ मधील जे कवितासंग्रह स्पर्धांसाठी उपलब्ध झाले, ते पाहता तरी मराठी कवितेचे चित्र उत्साहवर्धक नाही. अनुकरणशीलता, दिशाहीनता, उथळ एकसुरी आक्रोश. साचेबंद



अनुक्रमणिका






बटबटीत भावाविष्कार या गोष्टींचे दर्शन मोठ्या प्रमाणावर घडले. धड आशयघनताही नाही वा रचनाकौशल्यही नाही, अशी गत आहे. जेथे छंदोबद्धता आहे, तेथे गझलसदृश साचेबंद मांडणीचा मारा आढळतो. जेथे मुक्तछंद आहे, तेथे ती कवितेची आंतरिक गरज की एक पलायनवादी क्लृप्ती, असा प्रश्न पडतो. वापर छंदाचा असो वा मुक्तछंदाचा, मोठ्या प्रमाणावर छंदमुक्तीच आढळून येते ! अधुनमधून काही चमकदार काव्यकृती दृष्टोत्पत्तीस येतात; पण एका कवीच्या कवितेची स्वतंत्रस्वयंभू प्रतिमाच उभी राहात नाही. सध्याची बहुतांश कविता ही स्वत:चा चेहरामोहरा नसलेली कविता वाटते. स्पर्धेतील कवितासंग्रह वाचताना मराठी काव्यविश्वात फुटकळिकांचे राज्य नांदत आहे, असे जाणवले. सध्याच्या सार्वत्रिक उठवळीकरणाचा तर हा परिणाम नव्हे ना, असा प्रश्न पडतो. नाट्यक्षेत्रात जसे नटांपेक्षा 'वोल्ट' जास्त, तसे काव्यक्षेत्रात कवींपेक्षा 'कवडे' जास्त वाढले आहेत आणि त्यांच्या सुळसुळाटाने मराठी काव्यसृष्टी प्रदूषित बनली आहे. मंचीय कविता, गीतकारी, ध्वनिफिती व चित्रफिती यांच्या बाजारू आविष्कारांचे पेव फुटल्यामुळे आणि गझलेचा गळेकाढू रोमांचवाद वोकाळल्यामुळे अस्सल कविता हरवत चालल्याचे जाणवते. कविसंमेलनांच्या गर्दीमुळे कविता हा वाङ्मयप्रकार लोकप्रिय होण्याला निश्चितच मदत झाली; पण समूहमानसशास्त्रीय भोवऱ्यात अडकून कविता अधिक नाटकी व वक्तृत्वपूर्ण होऊ लागल्या. आजच्या जाहिरातबाज युगात कंपूशाह कवींना लौकिक प्रसिद्धी मिळवणे सोपे बनले असले, तरी त्यांच्या काव्याला जरासुद्धा अलौकिकतेचा स्पर्श आढळत नाही. प्रतिभा ही एक गूढ वलयांकित गोष्ट मानल्यामुळे अनुभवसमृद्धी व अभ्यासू वृत्तीची कवींना गरजच नाही, अशी प्रवृत्ती तर बळावलेली नाही ना? शोध घ्यायला हवा. बदलत्या नैसर्गिक व मानवी पर्यावरणाविषयीचे सखोल चिंतन कवींना करावेसे वाटते का? तपासायला हवे. दलितमुक्ती, स्त्रीमुक्ती इत्यादी जोमदार प्रवाहांमुळे एक सकस सामाजिक संवेदनशीलता साहित्यक्षेत्रात दिसू लागली; पण तीही आता चाकोरीत अडकू लागल्याचे जाणवते. लोकाभिमुखता म्हणजे लोकानुनय नव्हे, याची जाणीव करून देण्याचीही गरज वाटते. निव्वळ विद्रोह म्हणजे वाङ्मय नव्हे, याचे भान सुटत चालल्याचे अधिकाधिक प्रमाणात दिसून येते. सध्याचा काळ म्हणजे अनेक अर्थांनी मराठी कवितेतील आरडाओरड्याचे युग तर नव्हे ना, अशी शंका भेडसावते. जागतिकीकरणाच्या रेट्यामुळे सांस्कृतिक स्वत्वहरणाचा धोका उद्‌भवला आहे. अशा टप्प्यावरच मराठी कविता सवंग आणि नि:सत्त्व बनू लागली आहे. या गोष्टीची समाजशास्त्रीय मीमांसा करण्याची गरज या निमित्ताने अधोरेखित करावीशी वाटते.

केशवसुतांनी एका होतकरू कवीला १९०५ साली लिहिलेल्या पत्रातील काही भाग समारोपादाखल उद्धृत करतो. त्या पत्रात केशवसुत म्हणतात :

'नवीनच पद्यलेख लिहिणारास ते आपले लेख फार आवडतात. आणि ते प्रसिद्ध व्हावे अशी फार उत्सुकता असते. पण ती त्याने प्रथम दाबणे इष्ट असते. काहीतरी आणि कसेतरी लिहिलेले प्रसिद्ध करण्यात काय अर्थ?...

'कविता म्हणजे आकाशाची वीज आहे. ती धरू पाहणारे शेकडा ९९ आपणास होरपळून

मात्र घेतात. मी अशा ९९वांपैकीच आहे; म्हणून म्हणतो, भ्रमात असाल तर जागे व्हा...

'हल्ली महाराष्ट्रात ज्यांना गद्याच्या चार ओळीही जपून लिहिता येत नाहीत, असे वृत्तदर्पण्ये कवी पैशापासरी झाले आहेत. अशात आपली गणना करून घेऊ नका. वाणी ही फार मोठी देवता आहे. सामान्य देवतांच्या आराधनांससुद्धा फार जपावे लागते. मग या देवतेच्या आराधनास किती जपावे लागेल बरे ! तुम्हांस कविता करून कीर्ती मिळवावयाची आहे काय? तर कीर्तीच्या लालसेने धडपडणाऱ्या तरुणाकडे ती बहुधा ढुंकूनही पाहात नाही. उलट तिला तुच्छ करून आपल्याच नादात म्हातारे झालेले लोक तिला वरण्यास पसंत वाटू लागतात; आणि कित्येकांस तर तुम्ही मरून या म्हणजे मी माळ घालीन असे ती म्हणत असते.

'तुम्हास जगाच्या अंधारात आपल्या बुद्धीचा किरण पाडणे आहे काय? असेल तर तुमचे हृदय उललेले आहे काय? फाटले आहे काय? म्हणून मी विचारतो. कारण हृदयाच्या गाभाऱ्यात तेवत असणाऱ्या नंदादीपाचा प्रकाश जेव्हा फाटलेल्या हृदयाच्या फटीतून अंतर्मुख झालेला दृष्टीस पडतो, आणि तो प्रकाश जेव्हा बुद्धी परावृत्त करून जगावर पाडते, तेव्हा अंधारात चाचपडणारास वाट दिसू लागते. एरव्ही कागदावर दिव्याची चित्रे रंगवून 'अंधारांतून चालला आहां तर एवढा आमचा कंदील तरी घेऊन जा' असे म्हणून आग्रहाने ते आपले दिवे म्हणजे दिव्याची चित्रे लोकांच्या हाती देणारे स्वयंसेवक नाक्यानाक्यावर गर्दी करून उभे आहेत. त्यांच्या त्या दिव्यांच्या चित्रांनी त्यांना काय किंवा कोणाला काय, वाट थोडीच दिसणार आहे?...

'ता. क. तुम्हांला मोठे होण्याची इच्छा आहे काय? असेल तर ती चांगले होण्याच्या इच्छेच्या लगामी पाहिजे, आणि आपण चांगले आहो की नाही ते आईबापांच्या व घरातील लहानमोठ्या सर्व माणसांच्या मुद्रेत प्रथम पाहिले पाहिजे. असो.'

- केशवसुतांचे २० व्या शतकाच्या आरंभकाळातील हे उद्गार २० व्या शतकाच्या अस्तकाळातही पूर्वीइतकेच प्रस्तुत आहेत !

□

डॉ. राजा दीक्षित
२, तीनमूर्ती, ८६५, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०. दूरध्वनी : ४४७७८३७

---

## स्वागत

- **अमृतमंथन :** भाऊसाहेब थोरात, अमेय प्रकाशन, पुणे, पृष्ठे २२४
- **अमृतगाथा :** भाऊसाहेब थोरात, अमेय प्रकाशन, पुणे, पृष्ठे ३६२
- **कोंडमारा :** अरुण नाईक, अमेय प्रकाशन, पुणे, पृष्ठे ८०
- **रासमात :** वि. वि. देवगावकर, साहित्य कलादायी, पुणे, पृष्ठे ४८
- **रंग जीवनाचे :** विजय कुलकर्णी, नेहा प्रकाशन, पृष्ठे ६९
- **बासरी :** घन:शाम धेंडे, मानसन्मान प्रकाशन, पुणे, पृष्ठे ५८
- **मशाल :** माधव नेपोलियन, मानसन्मान प्रकाशन, पुणे, पृष्ठे ४६



अनुक्रमणिका

पुश्किन : द्विजन्मशताब्दीनिमित्त विशेष लेख

□

# पुश्किनचे मराठी समानधर्मे

□

डॉ. पंडित आवळीकर

*अलेक्सांद्र पुश्किन (१७९९-१८३७) या थोर रशियन साहित्यिकाच्या जन्माला ६ जून १९९९ ला दोनशे वर्षे पूर्ण होत आहेत. स्वातंत्र्याचा आणि प्रेमाचा शाहीर असा त्यांचा लौकिक आहे. आधुनिक रशियन साहित्याचे 'जनक' म्हणून ते जगन्मान्य आहेत. त्यांच्या कथाकाव्यांचा मूळ रशियनमधून मराठीत अनुवाद आणि अभ्यास करण्याचा प्रकल्प गेली दोन तपे डॉ. पंडित आवळीकर यांनी हाती घेतला होता. त्यासाठी काही काळ अभ्यागत प्राध्यापक म्हणून ते रशियात राहूनही आले आहेत. 'अलेक्सांद्र पुश्किन' १९७७ मध्ये त्यांची पुश्किनवरील तीन व्याख्याने आहेत. 'कॅप्टनची मुलगी' (१९७५) आणि 'बेल्किनच्या गोष्टी' (१९७७) ह्या अनुवादितकृती कॉन्टिनेन्टल प्रकाशनातर्फे पुनर्मुद्रित होत आहेत. 'यिव्गेनी अनेगिन'चा त्यांचा अनुवाद भारतीय भाषांतील पहिलाच काव्यानुवाद होय.*

कोणत्याही भिन्न भाषांतील साहित्यात आणि साहित्यिकांत सारखेपणा आणि वेगळेपणा आढळणं हे काही नवीन नाही. पण एखाद्या भाषेतील जगन्मान्य जगावेगळ्या अशा प्रतिभावंताचं मन, लेखन आणि जीवन यांच्या 'सारखं' काही आपण आपल्या भाषेत पाहतो, वाचतो, तेव्हा त्या सारखेपणाचे - उधारउसनवारीचे नव्हेत - अनेक पदर हाती येऊ लागतात. शेजारीच उभा असणारा वेगळेपणाही जाणवतो. 'समानधर्मे' या विशेषणाच्या मर्यादा कळतात. 'पुश्किन वाचताना 'मराठीतलं पुश्किनसारखं' काहीना काही खुणावत राहतं. एकाच वेळी चालणाऱ्या या 'समांतर' अथवा 'दुहेरी' वाचनानं पुश्किनप्रमाणंच सावरकर, कुसुमाग्रज यांच्यासारखी त्याच्या जातीची' मनं अधिक चांगली कळतात.

जुलमी निर्दयी राजवटी स्वकीयांच्या असोत की परकीयांच्या असोत; विचारवंतांची वा प्रतिभावंतांची घुसमट आणि मुस्कटदाबी; दीनदलितांचं निष्ठुर शोषण आणि याविरुद्ध होणारी अल्पजीवी बंडं वा क्रांती... या पार्श्वभूमीवर आणि त्यानंतर पूर्वपदावर येणाऱ्या हताश वातावरणात पुश्किन जन्मला, जगला, झुंजला आणि पुरून देखील उरला. हेच भागधेय सावरकर आणि कुसुमाग्रज या स्वातंत्र्य आणि क्रांती यांच्या उद्गात्यांना लाभलं. रशियन त्सारच्या रशियात पारतंत्र्यच

होतं. केवळ देशी बनावटीची राजवट म्हणजे स्वातंत्र्य नव्हे. म्हणून पुश्किननं स्वातंत्र्यसूक्तं आणि क्रांतिगीतं गायिली. त्याच्या (मो)बदल्यात जन्मभरची हद्दपारी, गावठी कैद, नजरकैद अथवा अपमानास्पद नोकऱ्याची खैरात मरेपर्यंत भोगली. सावरकरांनी काळंपाणी, जन्मठेप आणि अनन्वित छळ यांचा 'स्वातंत्रतेच्या स्तोत्रा'साठी स्वीकार केला. पुश्किनला हद्दपारीत पाठवणारं 'वोल्नोस्त' (१८१७) हे गुलामांना आणि दलितांना बंडाची चेथावणी देणारं स्वतंत्रतेचं स्तोत्रच होतं.

पुश्किनच्या वाङ्मयाला हुकुमशाहीच्या अवकृपेची झळ नेहेमीच लागली. 'सेन्सॉरशिप'चा ससेमिरा कधीच सुटला नाही. त्याच्या काळात (ही) 'सेन्सॉर' ही एक अत्यंत विनोदी गोष्ट होती. पुश्किनजवळ वक्रोक्तीचं विलक्षण सामर्थ्य होतं. ते कळण्याची आणि पेलण्याची कुवत या 'अंकुशा'त नव्हती. 'येकतेरिना' (कॅथरिन)चं 'कॅप्टनची मुलगी'तील चित्र, गरुड आणि घुबड यांची कथा ही त्याच्या व्याजोक्तीची बोलकी उदाहरणं आहेत. या ठिकाणी वक्रोक्तिप्रभू शिवरामपंत परांजपे यांचं आणि त्यांच्या वाङ्मयावर इंग्रजांनी घातलेल्या 'जप्ती'चं; त्यामुळे त्यांनी अनुभवलेला भारताच्या अपत्यवियोगाच्या दु:खाचं, सारखेपण आठवतं. माडखोलकरांच्या काही कादंबऱ्यांना हे 'हौतात्म्य' प्राप्त झाल्याचं कारण समजू शकतं. पण फडक्यांची 'शाकुंतल' जप्त होणं ही एक गंमतच होती. काही मिळत्या जुळत्या वाङ्मयीन वृत्ती-प्रवृत्ती सांगितल्या पाहिजेत. पुश्किनच्या जडणघडणीच्या काळात शालेय अभ्यासक्रमात शीघ्रकवित्व (improvisation) हा एक विषय होता. एका परीक्षेच्या प्रसंगी पुश्किनचं शीघ्रकाव्य ऐकून दिर्झाविन हा श्रेष्ठ कवी हेलावला होता. आनंदित झाला होता आणि त्यानं पुश्किनच्या भावी यशाचं भवितव्य वर्तवलं होतं. कवी यशवंत यांचे शालेय जीवनातील गुरू साधुदास हे शीघ्रकवी म्हणून प्रसिद्ध होते. त्यांचे यशवंतांवर जे संस्कार झाले, 'त्यातील दिलेल्या विषयावर तात्काळ काव्य लिहिणं' हाही एक योगायोग असावा. रविकिरणांच्या काव्यविषयक प्रयोगात अशा रचनांचं काही महत्त्व आहे. पुश्किनप्रमाणं यशवंतही तुरुंगात नसूनही तुरुंगात (येरवडा) राहात होते. नोकरी करीत होते. 'जग हे बंदीशाळा' हे जीवनसत्य पुश्किनच्या आणि त्यांच्या वास्तव जीवनाशी संबंधित आहे. कारागृहाच्या भिंतींची उंची कितीही वाढली तरी मनाला क्षिती न वाटणं ही त्यांची वृत्तीही पुश्किनच्या वृत्तीशी जुळती आहे. पुश्किनवर झाली तशी यशवंतांवर राज्यकर्त्यांची अवकृपा कधी झाली नाही. उलट बडोदा - नरेशांनी 'राजकवी' आणि दुसऱ्या यशवंत 'रायां'नी 'महाराष्ट्र कवी' म्हणून त्यांचा गौरव केला. "Just for handful of Silver he left us' अशी त्यांच्या बद्दल अन्य कोणी खंत व्यक्त केली की नाही, माहीत नाही. 'द्या आम्हाला सुळी' ही कविताही सरकारी दोषाला बळी पडली नाही. पडावी अशी मात्र होती.

पुश्किनच्या 'स्वातंत्र्य' प्रीतीबरोबर 'प्रीती' हे त्यांच्या काव्याचं आणि जीवनाचं प्रधान अंग होतं. 'रोमँटिसिझम्' या जबरदस्त वाङ्मयीन प्रवृत्तीचा आणि जीवन शैलीचा तो सहजोत्कट, प्रमाथी प्रभाव होता. त्याचं मूर्त रूप होतं : 'बायरन'— बायरनच्या काव्यानं

आणि जगण्यानं पुश्किन बराच काळ भारून आणि भारावून गेला होता. तो जणू त्याचं आराध्य दैवत बनला होता. विशेषत: 'स्त्री'विषयक अनुभवांवर, भावनांवर, कल्पनांवर बायरनची मुद्रा अमिट होती. यामुळं मूळच्या सौंदर्यलोलूप आणि काहीशा 'कमलभक्षक' वृत्तीमुळं आणि त्याच्या काळातही समाजात असणाऱ्या प्रेमानुगूल 'मोकळ्या' हवेमुळं, 'प्रेमिक आणि प्रेमाचा कवी' म्हणून त्याचं जगणं आणि वागणं भारतीय (?) दृष्टीनं भन्नाट होतं. बिंधास्त होतं. मराठी प्रेमकवीत 'पुश्किनसारखं' काही शोधणं, काही आहे असं सांगणं, एखाद्याला त्याचा (शंभरटक्के) उचित काळ लाभेपर्यंत - घाईचं, घायकुतेपणाचं ठरणार आहे. मदिरा आणि मदिराक्षी यांसारख्या चांगल्या गोष्टींबाबत तो चोखंदळ (connoisseur) होता. आपल्याकडे कोणी नव्हते, नाहीत, नसतील किंवा नसावेत असं नव्हे, अलौकिक प्रतिभावंतानं असं असणं हे गैर नाही. पुश्किन बाबतही त्याचं 'असं' किंवा 'तसं' असणं कलेच्या नीतीशास्त्राप्रमाणं अयोग्य नाही. हे पचेपर्यंत गोविंदाग्रज, बा. भ. बोरकर, कुसुमाग्रज यांच्या 'प्रेम आणि मरण', 'जपानी रमलाची रात्र' आणि 'पृथ्वीचे प्रेमगीत' यांसारख्या अथांग आणि उत्तुंग प्रेमकवितांची खोली आणि उंची आपल्या थिट्या हातांनी मोजावी.

गोविंदाग्रजांना आपल्या प्रियेचं नाव जाहीरपणानं घेता आलं नाही. 'रामाच्या ग बागेमधी चाफा नवतीचा' अशा उखाण्यात 'राम' आणि 'चंपा' ही नावं गुंफावी लागली. निदान असा शोध 'लावण्याची पाळी अतिउत्साही अभ्यासकांवर आली. पुश्किनला नुसता 'झिझी'चाच नव्हे, तर तिच्या कमरेचाही उल्लेख करता आला. 'लाटणं' आणि 'लॅटिन' संस्कृतीतला हा फरक असावा.

बोरकर हे तर पुश्किनप्रमाणंच 'लॅटिन' वातावरणात गोव्यात Via पोर्तुगाल - मुक्त श्वसन करू शकणारे कवी. आयुष्यातला पहिला चुंबनानुभव त्यांना एका मुलीनं (मार्गारीदनं) दिला. भरभरून प्रेम घेताना किंवा देताना त्यावर आपण पाप-पुण्याचे शिक्के मारले नाहीत, ही त्यांचीच दिलेली धीट व प्रांजल कबुली. त्यामुळं चोखंदळपणात पुश्किनच्या खुर्चीला खुर्ची लावून बसण्याचा त्यांना अधिकार. परंतु 'जपानी रमलाची रात्र'चं अत्यंत गद्याळ स्फूर्तिस्थान त्यांनी सांगितलं आणि त्या कवितेची कलाच गेली तरीही त्या कवितेतलं कवितेमागलं नव्हे, चिरसौंदर्य पुश्किनलाही हेवा वाटावं असं आहे. उथळ नव्हे तर उदात्त प्रेमही पुश्किनमध्ये आहे. त्याचा डॉन जॉन प्रेमासाठी मरण पत्करतो. स्वत: पुश्किननं प्रेमासाठीच प्रतिस्पर्ध्याशी द्वंद्व करून मरणाला आमंत्रण दिलं. त्याच्या काळात याला डॉन् जॉन म्हटलं गेलं; त्यानं दिलेली आपल्या ११३ प्रेयसींची नावं 'डॉन जॉन लिस्ट' म्हणून प्रसिद्ध असली तरी एकनिष्ठ प्रेमाला त्याच्या दृष्टीनं महत्त्व नव्हतं असं नव्हे. आपली पत्नी नाताल्या हिच्या नखरेलपणाचा आणि 'नाचरे'पणाचा तिच्या विषयीच्या प्रवादांचा मन:स्ताप होऊनही - तिच्या विषयीच्या आपल्या प्रेमाबद्दलचा भ्रमनिरास होऊनही पुश्किननं तिचा सन्मान जपला. आपल्या मृत्यूनंतर तिनं कुणाशीही विवाह करावा अशी उदार अनुमती दिली.

The Vows are all broken,
And light is thy fame;
I hear thy name spoken
And share in its shame

हा बायरनचा जळजळीत अनुभव पुश्किननं घेतला. जिच्या पावलांसाठी आपल्या हृदयाच्या पायघड्या केल्या, ती हृदये तुडवीत नटव्या थाटापाठी गेली. हा गोविंदाग्रजांचा स्वप्नभंग याच जातीचा होता. परंतु स्त्रीच्या बेइमानी बरोबर तांब्यांच्या 'वाटेच्या वाटसरा'तील विवाहितेची आठवण करून देणारी तात्यांना पुश्किननं रंगवलेली आहे. पण या इमानी प्रेमाचा प्रियकराला येणारा अनुभव प्रेमनैराश्याचाच ठरणार !

होउनि खंती वदलिस अंती
नकळत आतुनि ढळले मी
सावरुदे मज दूर हो कसा
ऋण फेडिन पुढल्या जन्मी

हे ऐकल्यावर 'स्वप्नांची लय उतरेना' (बोरकर) हे खरं. पण स्वप्न संपलं होतं हेही तितकंच खरं.

आशा हे स्वप्नाचं एक रूप. जगण्याच्या इच्छेचं एक नाव. मन आशा करतं म्हणजे काय, तर एक (एक) स्वप्न पाहतं. स्वप्नभंगही पाहतं. आणि अखेर हताश होतं. कवी हे तर स्वप्नांचे सौदागर असतात. व्यावहारिक लाभाविण चालणारा हा सौदा जीवघेणा तरी सुखद. हा अलौकिक 'स्वप्न-व्यापार' रोमँटिक प्रवृत्तीचाच लक्षणीय आविष्कार असतो. पुश्किन आणि त्याचे मराठी समानधर्मे यांनी स्वप्नं पाहिली आणि त्याची अखेर पाहिली. या दुनियेच्या बाजारी 'विसर्जिली मी स्वप्ने सारी' असंही नि:संगपणानं सांगितलं.

पुश्किनचे मराठी समानधर्मे - निदान त्याचे काही मनोधर्म - निरखत, पारखत असताना कुसुमाग्रज या नावापाशी थवकावं लागतं, थांबावं लागतं. आणि कुसुमाग्रज 'समग्र' (in totality) कळेपर्यंत दोघांतील काही साम्य निश्चित महत्त्वाची ठरतात. 'स्वातंत्र्य' या मूल्यासाठी त्याच्या प्राप्तीसाठी बंड अथवा क्रांती करण्याची अदम्य प्रेरणा पुश्किन आणि कुसुमाग्रज यांच्या काव्यांनी दिली. 'दि काब्रिस्त उठाव' (१४ डिसेंबर १८२५) या नावानं प्रसिद्ध असलेल्या बंडामागं पुश्किनच्या प्रक्षोभक कविता होत्या. तर 'गर्जा जयजयकार' (१९३९) या क्रांतीगीतानं कुसुमाग्रजांनी केवढा मोठा चमत्कार घडविला हा इतिहास अजून ताजा आहे. एखादा कवी एखाद्या ज्वलंत कवितेनं बलदंड सत्तेपुढं दंड थोपटून उभं राहण्याचं बळ खचलेल्या मनांतही कसं जागवतो, याचं हे एक जागतिक उदाहरण आहे.

'सिबीरमधील खाणींच्या' (१८२७), 'उदास अंधार कोठडीत', कोंडलेलं दिकाब्रिस्त बंडखोर असोत वा डमडमच्या तुरुंगातील अन्नत्याग करणारे राजबंदी असोत; त्यांच्या स्वतंत्र आणि भव्योत्कट चित्रणामागं पुश्किन आणि कुसुमाग्रज यांच्या अबोध मनात बायरन होता. "On the Castle of Chillon' ही त्याची ज्वालाग्राही-ज्वालादायी कविता होती. विशेषत:

And when thy sons to fetters are Consign'd ,
To fetters, and the damp Vault's dayless gloom,
Their country conquers with their martyrdom,
And Freefom's fame find wings on every wind.

या ओळी दोघांच्याही कवितांतील काही



अनुक्रमणिका






शव्दप्रयोगांचा मूळस्त्रोत म्हणून वायरनकडेच अंगुलिनिर्देश करतील. उदा.

.......तुझी मुले ही या अंधारात
वद्धकरांनी .........

मुळातील Libertyला 'आई' म्हणण्याचं स्वातंत्र्य - कुसुमाग्रजांनी घेतलं आहे. पुश्किनच्या कवितेतील 'उदास अंधार कोठड्या', "damp vault's' इत्यादींचं स्थलांतर आहे.

'बायरन' (१९३६) ही कुसुमाग्रजांची कविता ही जशीच्या तशी 'पुश्किन' या शीर्षकाखाली वाचण्यासारखी आहे. त्याचवेळी 'कुसुमाग्रज' हे नावही या कवितेला अन्वर्थक ठरण्यासारखं आहे. एकाच वेळी वायरन, पुश्किन आणि कुसुमाग्रज यांचे मनोधर्म आणि काव्यधर्म या कवितेत प्रकट झालेले दिसतात. बायरनच्या गर्वगीतांतले भव्य उग्र वादळ, आणि मेघखंडातून तळपणारा भास्कर; साखळ्या तोडायला पंख उधळणारा वद्ध सुपर्ण; नाजुक पाकळ्यात अडकलेला वागेतला तस्कर; ही त्याची रूपं विलक्षण लोभस आहेत. रशियनमध्ये पुश्किन आणि मराठीत कुसुमाग्रज हे बायरनसारखे आहेत. म्हणून एकमेकांसारखे आहेत. ते काही एकमेकांचे 'क्लोन्स' नव्हेत. स्वत:ची वैशिष्ट्ये असूनही सारखे आहेत.

'ध्येय, प्रेम, आशा यांची
होतसे का कधी पूर्ती
वेड्या परी पूजतो या
आम्ही भंगणाऱ्या मूर्ती'

हा एकट्या कुसुमाग्रजांचा नव्हे, तर या तीनही श्रेष्ठ कवींचा रोकडा अनुभव आहे. देशाच्या स्वातंत्र्यासारख्या ध्येयाबाबत तिघांचाही मनोभंग झाला. युद्ध, बंड, क्रांती यात भाग घेण्याचं, त्यांना प्रेरक ठरण्याचं देवदुर्लभ भाग्य त्यांना मिळालं. परंतु, 'हेचि फळ काय मम तपाला?' असा प्रश्न विचारण्याची पाळी त्यांच्यावर आली. ही पाळी आणणाऱ्यांना 'विनवणी'च्या नावाखाली 'फटके' सुनावण्याची वेळ आली. व्यक्तिगत जीवनात प्रेम आणि आशा याही वास्तवात उतरू शकत नाही. लग्न ही प्रेमाची यशस्वी परिणती मानावी असा प्रत्यय ना बायरनला आला; ना जीवन म्हणजे फरफटच होती. 'लग्न आत्म्याचं खच्चीकरण करतं' (Marriage smasculates the Soul !') असं पुश्किनचं मत होतं. 'आता तू माझी बायको झाली आहेस. तेव्हा तुझा तिटकारा करायचा मला अधिकारच आहे.' अशा आशयाचं बायरनचं वाक्य लोकांच्या तोंडी आहे. म्हणजेच सखीनं नकार दिल्यानं वा होकार दिल्यानं प्रेम-मूर्ती भंगते(च). आशापूर्ती फारच थोड्यांच्या वाट्याला येते आणि येते तेव्हा 'पूर्ती' हा समाधानाचा नव्हे, तर एखादी गोष्ट संपल्याच्या दु:खाचा क्षण ठरतो.

'अनंत अमुची ध्येयासक्ती अनंत अन्
आशा
किनारा तुला पामराला !'

हा 'गर्व' मानवी जीवनातला एक आवश्यक mood आवश्यक मुक्काम आहे, यात शंका नाही. पण हा गर्व नाहिसा करीत असतो - 'प्राप्ती'चा क्षण; 'तृप्ती'चा क्षण. म्हणूनच 'आला किनारा' मधील उल्हास आणि उन्माद हे वेगळ्या प्रकारचं 'मूर्तिभंजन'च असतं. ध्येय, प्रेम, आशा या 'भंगणाऱ्या मूर्ती'ची पूजा वेड्याप्रमाणे करायची असते. त्यात आनंद असतो आणि

भग्नमूर्तीचं पूजन-भजन करायचं नसतं. तर 'यजन', 'अग्निहोत्र' चालूच ठेवावं लागतं. "जनात नव्हे, मनात. विच्छिन्न मूर्तीपुढे 'स्थंडिल' धगधगत असतं. altar सारखं. आणि बायरन काय, पुश्किन काय किंवा कुसुमाग्रज काय, तेथे 'शीतोदकाचे सडे' शिंपीत असतात. 'मृत्यूच्या कलशातील जल शीतल' पीत असताना, पुश्किन प्रमाणंच कुसुमाग्रजही कोणाचं किती देणं द्यायचं आहे, हे शेवटच्या क्षणी सांगतात आणि पुश्किनप्रमाणंच प्रगाढ, उदात्त आणि विजयी मुद्रेनं मृत्यूला उराउरी भेटतात. हा केवळ योगायोग नव्हे. 'उदकात विस्तवात / न्हात जळत रहावे' या प्रतिज्ञेची ती परिपूर्ती होती.

□

डॉ. पंडित आवळीकर
१४/ई/२, सदनिका क्र. ६, सिद्धांतनगर,
औंध, पुणे ४११ ००७.

## स्वागत

- **मेंदूची ओळख :** प्रेमानंद रामाणी, अनुभव प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १४८
- **सोनजातक :** प्रा. रतनलाल सोनग्रा, प्रबुद्धनायक प्रकाशन, पृष्ठे १०९
- **माणसं आमच्या कोकणातली :** राजा राजवाडे, राजा प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १०२
- **शरीर एक अद्‌भुत यंत्र :** मोहन आपटे, राजा प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १५४
- **गणितातील चाकोरी बाहेरील वाटा :** वा. के. वाड, राजा प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १४२
- **गणिती गप्पा :** वा. के. वाड, राजा प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ८८

## श्री. म. श्री. दीक्षित यांना अमृतमहोत्सवानिमित्त हार्दिक शुभेच्छा !



प्रसिद्ध साहित्यिक आणि साहित्य चळवळीतील ज्येष्ठ कार्यकर्ते म. श्री. दीक्षित यांनी दि. १६ मे १९९९ रोजी वयाची ७५ वर्षे पूर्ण केली आहेत.

महाराष्ट्र साहित्य परिषदेशी त्यांचा गेली पन्नास वर्षांहूनही अधिक काळ अत्यंत निकटचा संबंध आहे. परिषदेत त्यांनी अनेक भूमिकांतून काम केले आहे. विश्वस्त पदावरून नुकतेच ते निवृत्त झाले आहेत.

पुणे नगर वाचन मंदिराचे ते अध्यक्ष आहेत. चित्पावन संघ, वसंत व्याख्यानमाला, पुणे ऐतिहासिक वास्तू स्मृतिफलक, भारत इतिहास संशोधन मंडळ सार्वजनिक सभा, महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक सभा इत्यादी अनेक सार्वजनिक संस्थांचे ते क्रियाशील कार्यकर्ते आहेत.

त्यांनी लिहिलेल्या जिजामाता, सत्तावनचे सप्तर्षी, पेशवाईतील रत्ने, झुंजार सेनानी, पुण्यश्लोक अहिल्याबाई, तात्या टोपे, नेपोलियन, बाळाजी विश्वनाथ, भारतरत्न नेहरू, स्वातंत्र्यवीर सावरकर, डॉ. आंबेडकर, लालबहादूर शास्त्री, जिजाई वगैरे चरित्रांच्या अनेक आवृत्त्या प्रकाशित झाल्या आहेत. नेमकी, सुटसुटीत भाषा हे त्यांच्या चरित्रलेखनाचे वैशिष्ट्य आहे.

त्यांनी अनेक स्मरणिका संपादित केल्या आहेत. त्यातील 'पुण्याई' (पुणे संमेलन १९७७) 'ग्रंथनादा' (पुणे नगर वाचन मंदिराच्या १५० व्या वर्धापनदिनानिमित्त प्रकाशित झालेली स्मरणिका) या विशेष्ष उल्लेखनीय आहेत.

त्यांना आरोग्यपूर्ण दीर्घायुष्य लाभो, हीच ईश्वरचरणी नम्र प्रार्थना.

— संपादक



अनुक्रमणिका

# महानुभावीय स्फुट काव्यरचनांचा अभ्यास

□

डॉ. दीपा देशपांडे

**भूमिका**

महानुभाव संप्रदाय हा महाराष्ट्रातील एक महत्त्वाचा भक्तिसंप्रदाय आहे. बाराव्या शतकातील महाराष्ट्राच्या धार्मिक आणि वाङ्मयीन इतिहासात महानुभाव साहित्याचे योगदान लक्षणीय आहे. महानुभाव संप्रदाय हा कर्मठपठणाविरुद्ध बंडाचा झेंडा उभारणारा, मोक्षमार्गात स्त्री पुरुषांना समानता आहे हे मानणारा, धर्ममंदिरात शूद्रादिकांनाही प्रवेश देणारा, मराठी भाषेचा आणि महाराष्ट्राचा अभिमानी असणारा हा पंथ केवळ महाराष्ट्रातच नव्हे तर महाराष्ट्राबाहेर देखील वाङ्मय वैविध्याने आणि प्रचंड मौलिक ग्रंथ निर्मितीने 'महानुभाव' म्हणून सातासमुद्राच्या पलिकडे देखील मान्यता पावलेला आहे. मराठी भाषेत सर्वप्रथम उपलब्ध झालेली पहिली ग्रंथसंपत्ती याच पंथाने निर्माण केली आहे. त्यादृष्टीने मराठी वाङ्मयाची गंगोत्री म्हणून महानुभावीयांच्या ग्रंथनिर्मितीकडे बोट दाखवावे लागते. महानुभावांचे हजारो ग्रंथ हस्तलिखित लिपीनिमिष्ट पोथ्यांच्या स्वरूपात शतकानुशतके होते. ग्रंथनिर्मिती आणि जतन जोपासना यांचे काम त्यांनी अपार परिश्रमाने उत्तम प्रकारे केल्यामुळे आज मराठीच्या समृद्धीला त्यांचा हातभार बऱ्याच मोठ्या प्रमाणात लागलेला आहे. केवळ मराठी भाषेच्या गौरवातच त्याने समाधन न मानता मराठी भाषेचा ध्वज त्यांनी खैबर खिंडीपासून ते काबूल-कंदाहार पंजाब पेशावरापर्यंत फडकावीत ठेवला. लोकगंगेत भक्तीगंगेचा सुरेख संगम घडवून आणला.

पंथ प्रवर्तक आणि महानुभाविय कल्पनेप्रमाणे परमेश्वर अवतार श्रीचक्रधर स्वामींनी आपले कार्यक्षेत्र महाराष्ट्र निवडले आणि प्रामुख्याने लोकजीवनातील प्रमुख भावनाविनिमयाचे माध्यम मराठी हीच आपली धर्मभाषा म्हणून स्वीकारले. त्यामुळे आधुनिक महाराष्ट्राला श्रीचक्रधरांचे ऋण मानणे क्रमप्राप्त ठरते. श्रीचक्रधर हे महाराष्ट्रातील एक सुप्रसिद्ध पंथप्रवर्तक होते. जन्माने ते महाराष्ट्रीय नसले तरी त्यांचे सर्व कर्तृत्व महाराष्ट्रातच झाले. त्यामुळे ते महाराष्ट्रीयांचे होते असे मानावयास हरकत नाही. महाराष्ट्राविषयी त्यांच्याइतका आदर आणि प्रचंड अस्मिता दुसऱ्या कोणीही व्यक्त केलेली नाही.

श्रीचक्रधरांनी आपल्या अनुयायांना, भक्तांना 'महाराष्ट्री असावे' असे सांगितले. या वचनाचा अर्थ विशद करताना भाष्यकारांनी जे भाष्य केले आहे, ते अतिशय महत्त्वाचे आणि मोलाचे आहे ते असे -

'तरी महाराष्ट्र म्हणिजे' :



अनुक्रमणिका






'महंत राष्ट्र म्हणोनि महाराष्ट्र : राष्ट म्हणिजे देश परि सुखरूप : आणि इष्टकारक : --- --- महंत म्हणिजे थोर : एक देश भूमी थोर : एक देश मनुष्ये थोर : एक देश ऐश्वर्ये थोर : एक देश सामर्थ्ये थोर : ------

महाराष्ट्र सात्विक : तेथचे जडचेतन पदार्थ तेही सात्विक : तेथ असता कव्हणीचि शरीर मानसिक उपद्रव नुपजति : अणिके देशी शारीर मानसिक उपद्रव उपनले तरी ते महाराष्ट्री असता समति : तेथचां अन्नोदकी शमति: तेथचा औषधी शमति: तेथचा वारा: झड : पाडस : तेही सात्विक : तेणे सकळ उपद्रव शमति:'

श्रीचक्रधरांनी बाराव्या शतकात महाराष्ट्राचे महिम्नस्तोत्र विशद केले आणि यामुळेच महाराष्ट्रात विविध धर्म-संप्रदाय गुण्यागोविंदाने नांदले असे म्हटले पाहिजे.

जी गोष्ट त्यांनी महाराष्ट्राविषयी केली तीच गोष्ट त्यांनी मराठी भाषेविषयी केली. महाराष्ट्रात आल्यानंतर आपल्या दैनंदिन व्यवहारासाठी व धार्मिक निरुपणासाठी त्यांनी स्वत: महाराष्ट्रातील जनतेच्या भाषेचा - मराठी भाषेचाच पुरस्कार केला. अखिल भारतात पूज्य असलेल्या श्रीमद्‌भगवद्‌गीतेचे तत्त्वज्ञान कालमानानुसार परिष्कृत करून ते त्यांनी मराठी जनतेला त्यांच्याच मातृभाषेतून उपदेशिले. त्यामुळे ब्रह्मविद्येची कवाडे सर्वसामान्य माणसाला सहजगत्या उलगडली गेली. त्यांच्या प्रयाणानंतर त्यांची वचने जशीच्या तशी लिहून ठेवली गेल्यामुळे मराठीला महानुभावांच्या दृष्टीने धर्मभाषेची प्रतिष्ठा लाभली.

श्रीचक्रधरांचे हृद्‌गत उत्तम रीतीने जाणणाऱ्या नागदेवाचार्यांनी आपल्या शिष्यांना मराठीतूनच ग्रंथरचना करण्याचा आदेश दिला. त्यामुळे मराठीत सुंदर असे गद्य-पद्य ग्रंथ, स्फुट-वाङ्मय प्रचंड प्रमाणात निर्माण झाले. थोडक्यात महाराष्ट्र आणि मराठी भाषा यांच्याशी श्रीचक्रधरांचा निकटचा संबंध होता. त्यांच्या उपदेशाचे अनेक परिणाम महाराष्ट्राच्या संस्कृतीवर झालेत. त्यामुळे त्यांच्या चारित्र्याचे आणि कार्याचे विविध दृष्टीनी पर्यालोचन करण्याचा पुष्कळ विद्वानांनी प्रयत्न केला. ज्ञानेश्वरपूर्व काळातील 'लीळाचरित्र' ही चक्रधरस्वामींच्या जीवनाची दैनंदिनी आहे. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक, सामाजिक जीवनाची मुद्रित मुद्रा या ग्रंथातून उमटली आहे.

अनन्य भक्तीचा पुरस्कार करून सर्वसामान्य माणसाला मोक्षाचा मार्ग दाखवणाऱ्या श्रीचक्रधरस्वामींच्या आचार-विचारातून, त्यांच्या संभाषणातून जे वाङ्मयीन विश्व अवतरले ते प्राचीन मराठीचे अहेव लेणे ठरले आहे. आजच्या संपन्न आणि विकसित गद्याची पूर्वपीठिका पाहताना महानुभावीय गद्याची आपणाला त्वरेने गरज भासते.

या महानुभाव मराठी वाङ्मयाचा अभ्यास अनेक मराठी संशोधकांनी केला आहे. अजूनही महानुभावीय वाङ्मयाचा अभ्यास करण्यात अनेक संशोधक मग्न आहेत. या महानुभवा संशोधनातील बिनीचे संशोधक म्हणून नेने, भवाळकर, य. खु. देशपांडे. डॉ. वि. भि. कोलते, वि. ल. भावे, अ. का. प्रियोळकर, डॉ. शं. गो. तुळपुळे, डॉ. यू. म. पठाण, डॉ. वसंत जोशी, डॉ. व. दि. कुलकर्णी, डॉ. अण्णासाहेब अडसोड, चंद्रकांत निंभोरकर, [illegible]म. भुसारी, डॉ. अ. ना. देशपांडे यांची नावे सहज डोळ्यासमोर येतात, तसेच अखिल भारतीय महानुभाव परिषदेचे अध्यक्ष प. पु. प. म. महंत नागराजबाबा महानुभव औरंगाबाद,

महंत कृष्णदास महानुभव हैद्राबाद यांनी अध्यात्मिक संशोधनाद्वारे अनेक पुस्तके प्रकाशित केली आहेत. महंत गोपीराजबाबा ऋद्धीपूर यांच्या पोथीशाळेने अनेक अभ्यासकांची परिपूर्ती केली आहे.

याप्रमाणे अनेकांनी आजवर या संप्रदायाच्या साहित्याचा अभ्यास चौकसपणे केला आहे. तरीही महानुभवांच्या स्फुट वाङ्मयाचा अभ्यास अजून उपेक्षितच आहे. महानुभावांच्या स्फुट वाङ्मयात, गद्य स्फुट वाङ्मय आणि पद्य स्फुट वाङ्मय असे विभाग पडतात. पैकी महानुभावीय स्फुट काव्यरचनांचा अभ्यास असा विषय मर्यादित करून मी हा अभ्यासास निवडला आहे.

महानुभावीय गद्यरचनेसोवत त्यांची पद्यरचना किती समृद्ध आहे आणि त्यामुळे मराठी सारस्वतात कोणत्या प्रकारची भर पडते या दृष्टीने माझा अभ्यास मी या प्रवंधातून मांडला आहे. या अभ्यासामुळे महानुभाव पंथ आणि महानुभाव स्फुट काव्यरचना यावर नव्याने प्रकाश पडणार आहे. अनुपलब्ध काव्यरचना उपलब्ध करणे व ज्ञात काव्यरचनांचा संशोधनपर अभ्यास करणे, हे प्रस्तुत प्रवंधाचे उद्दिष्ट आहे. या दृष्टीने महानुभावांच्या आरत्या, स्तोत्रकाव्ये, रूपककाव्ये, पदे, धुवे, चमत्कृतीपूर्ण रचना या मूलभूत साधनांचा धांडवळा घेऊन हा अभ्यास निष्कर्षाप्रत नेण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामुळे महानुभावीय स्फुट काव्यरचनांचा अभ्यास हा प्राचीन मराठी साहित्यातील दुर्लक्षित वाङ्मयाचा अभ्यास येथे साधार मांडण्याचा केलेला प्रयत्न या प्रवंधातून अभ्यासकांना निश्चित प्रेरक ठरेल, याची मला खात्री आहे.

**महानुभावीय स्फुट काव्यरचनांचा अभ्यास**

अनुक्रमणिका

**प्रकरण पहिले :- महानुभाव पंथाची पूर्वपीठिका :**

प्रास्ताविक - महानुभाव संप्रदाय पंथ नामनिश्चिती - श्रीचक्रधरपूर्वकाल (महानुभाव पंथ पौराणिक ऐतिहासिक दृष्ट्या) - नागदेवाचार्य - लीळाचरित्र - स्मढतिस्थल - नागदेवाचार्यानंतर - आम्नायांची निर्मिती - उपध्ये आम्नाय - कवीश्वर आम्नाय - पंथाचे स्वरूप - तत्त्वज्ञान - चार स्वतंत्र पदार्थ - जीवाचे स्वरूप - देवता - माया - प्रपंच - गुणधर्म - साम्य - भेद - ईश्वर स्वरूपाचे गुणधर्म - सारांश - फरक - समारोप - परमेश्वर अवतार - ईश्वरोपासना - ज्ञानाने मोक्ष - अनुसरण - भक्ती मार्ग - महानुभवांचा आचारधर्म विकारविकल्पशून्य - स्वभावमात्रे - भिक्षाव्रत - वस्त्रप्रावरण - निरालंवी - देवता स्मरणे - नामस्मरण - जन्मश्रेणी - साधकाचे व्रत पंचक - गुरुभक्ती - सत्संग - शास्त्राध्ययन/परमेश्वरशास्त्र - महानुभाव पंथाचे संथान प्रकार - प्रसाद - प्रसाद नमस्कार वचने - मूर्तीध्यान स्मरण - भजनपूजनादि विधी - अतिथिसत्कार - महानुभाव पंथाचे वाङ्मयासंवंधी काही पंथीयतरांचे अभिप्राय - महानुभावांचे आहे आणि सांकेतिक लिपी - स्थानांचे प्रकार - सांकेतिक लिपी - समारोप.

**प्रकरण दुसरे :- महानुभाव स्फुट काव्यरचनांची प्रेरणा व स्वरूप :**

प्रास्ताविक - महानुभाव स्फुट काव्य लेखनाच्या प्रेरणा आणि प्रवृत्ती - स्फुट काव्यरचनांचे स्वरूप-आरती - स्तोत्र रचना - महानुभावांची लोकगीते पदे आणि धुवे - चौपद्या - रूपक काव्य गोपाल मुनींचे ज्ञानगारूड - चित्रकाव्यनिर्मिती वंध.



*प्रा. डॉ. दीपा विवेक देशपांडे*
*मराठी विभाग प्रमुख,*
*कन्या महाविद्यालय, इस्लामपूर, जि. सांगली*
*शिक्षण : एम्. ए., बी. एड्.*
*नुकतीच पीएच्. डी.ची सन्माननीय पदवी मिळाली.*
*मार्गदर्शक : डॉ. कन्हैय्या कुंदप*
*प्रभारी प्राचार्य, सद्‌गुरू गाडगे महाराज, कॉलेज, कराड*

*उत्तम वक्ता, ज्ञानेश्वरी आणि संत वाङ्मयावर व्याख्याने होतात. स्त्रीजीवनावर अनेक व्याख्याने दिली आहेत. अनेक महिला मेळावे, शिबिरे, उद्योजक शिबिरे आयोजित केली आहेत. महिला पतसंस्थेची विद्यमान चेअरमन, महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा, इस्लामपूर उपाध्यक्ष.*

*इस्लामपूर येथे दरवर्षी साहित्य संमेलनाचे आयोजनासाठी सक्रीय सहभाग.*

*दै. सकाळ, केसरी, तरुण भारत मधून स्फूट लेखन केले आहे. 'महानुभाव' मासिकामध्ये 'महदंबसे धवळे : प्रेरणा व स्वरूप' वर लेख प्रकाशित. महानुभाव विशेषांकासाठी 'महानुभावीय स्त्रियांचे योगदान' वर लेख.*

*आकाशवाणीवर भाषण, संवादलेखन, संतमालिकेत संत मुक्ताबाईंवर भाषण प्रसारित. तसेच आचार्य जावडेकर जन्मशताब्दीनिमित्त सावित्रीबाई फुले इत्यादी विषयांवर भाषण प्रसारित. स्त्रियांच्या आरोग्य, सण-उत्सव या विषयावर संवादलेखन. नुकतेच कॉ. डी. जी. देशपांडे यांच्या कार्यकर्तृत्वावर आधारित 'कर्मयोगी' या पुस्तकाचे संपादन प्रकाशित झाले आहे. सामाजिक कार्याची आवड.*
*फलटण, सातारा या ठिकाणी महानुभावमेळाव्यामध्ये प्रमुख वक्ता म्हणून उपस्थिती.*

**प्रकरण तिसरे :- महानुभावीय आरती रचना :**

प्रास्ताविक - आरती शब्दाची व्युत्पत्ती - हेतु - महानुभावीय आरती स्वरूप आणि अभिव्यक्ती - स्थानमहात्म्यपर आरत्या - इतर आरत्या - समारोप.

**प्रकरण चौथे :- महानुभावांची स्तोत्र काव्यरचना :**

प्रास्ताविक - महानुभाव स्तोत्रकार - महानुभावीय स्तोत्र विषय - गद्यराज स्तोत्र - निर्वेद स्तोत्र - मूर्तीवर्णन स्तोत्र - संकटहरण स्तोत्र - नित्यदिनीलीळा स्तोत्र - साधनामृत स्तोत्र - मार्गमंजिरी स्तोत्र - विश्वनाथबासांचे ध्यानामृत स्तोत्र - भीष्माचार्यांचे गद्यराज स्तोत्र - तीर्थमाला स्तोत्र - संकटनाशक स्तोत्र - आयमुनी कारंजकर यांचे पंचावतार वर्णन - परमहंसधर्म

मालिका स्तोत्र - रासक्रीडा स्तोत्र - देवदेवेश्वर स्तोत्र - महानुभाव स्तोत्रांचे वेगळेपण - महानुभाव स्तोत्रातील दैवते - महानुभाव स्तोत्रांचे विषय - महानुभाव स्तोत्रांचे आकृतीबंध - महानुभाव स्तोत्रातील तत्त्वज्ञान - उपासना पद्धती - महानुभाव स्तोत्रातील समाज दर्शन - स्तोत्रांची भाषाशैली/काव्यसौंदर्य - समारोप.

**प्रकरण पाचवे :- महानुभावांची रूपककाव्ये आविष्कार आणि विशेष :**

प्रस्तावना - डंककाव्य - ज्ञानदेवकृत पंडुगीता - गोपालमुनीचे ज्ञानगारूड - पंडित दामोदरकृत चौपद्या - उमाइसेची चौपदी - समारोप.

**प्रकरण सहावे :- महानुभावीय लोकगीते, पदे आणि धुवे :**

लोकगीत स्वरूप - स्त्रिया आणि लोकगीते, बोलीभाषा - लोकगीतांची स्थलविशिष्टता - प्रेरणा - सार्वकालिकता - स्वरप्रधानता लोकसाहित्याची निर्मिती - तुलना - महानुभावांची पदे आणि धुवे - महानुभाव दर्शन प्रकाश एक स्फुट प्रतिबोधकाव्य - निष्कर्ष.

**प्रकरण सातवे :- महानुभावांच्या काही चमत्कृतीपूर्ण रचना :**

प्रास्ताविक - आयमुनी कारंजकर जीवन चरित्र आणि गुरुपरंपरा - अनंतमुनी की आयमुनी? - अनेक अनंतमुनी - आयमुनी कारंजकर यांची काव्यरचना - रुक्मिनी सैंवर - म्हाइंभट व नागदेवाचार्य भेटवर्णन पंचावतार वर्णन - श्रीकृष्णलीला - अभंग - ओवी - समारोप व निष्कर्ष - चित्राकृतीबंध काव्य - अष्टदलकमलबंध - चमरबंध - मालाबंध - प्राचीन चित्रबंध.

**प्रकरण आठवे :- स्फुट काव्यरचनांतून प्रकटणारे तत्त्वज्ञान :**

प्रस्तावना - आरती या स्फुट काव्यरचनेतून दिसणारे तत्त्वज्ञान - महानुभाव स्तोत्रातील तत्त्वज्ञान - महानुभावीय गीते, पदे आणि धुवे यातील तत्त्वज्ञान - रूपककाव्ये - समारोप.

**प्रकरण नववे :- स्फुट काव्यरचनांतून प्रतिबिंबीत समाजदर्शन :**

प्रास्ताविक - राजकीय जीवन - सामाजिक जीवन - पूजाद्रव्ये - भविष्यवेड - लोकगीतातील अलंकार - खाद्यपदार्थ - भविष्य निधी - स्त्रीछळ - पत्रव्यवहार - स्त्रीलावण्य - ग्रामनामे - रोग - विविध कला - धार्मिक जीवन - सांस्कृतिक जीवन.

**प्रकरण दहावे :- स्फुट काव्यरचनांचा वाङ्मयीन अभ्यास व सारस्वतातील भर : समारोप**

**परिशिष्ट**

परिशिष्ट १-आरती संहिता, परिशिष्ट २-स्तोत्र संहिता, परिशिष्ट ३-आरती आद्यचरण सूची, परिशिष्ट ४-लोकगीते, पदे, धुवे, संहिता, परिशिष्ट ५-चमत्कृतीपूर्ण रचना संहिता, परिशिष्ट ६-स्तोत्र आद्य चरण सूची, परिशिष्ट ७-स्फुट गद्य रचनांची नोंद, परिशिष्ट ८-रूपककाव्य संहिता, परिशिष्ट ९-संदर्भग्रंथ सूची

**समारोप**

महानुभावांचे मराठी वाङ्मय हे महाराष्ट्र सारस्वतातील एक समृद्ध आणि श्रीमंत दालन आहे. महानुभावीय वाङ्मयावर अनेक अंगांनी संशोधन होत आहे. महानुभाव तत्त्वज्ञान, आचार धर्म, महानुभावांचे साती ग्रंथ, महानुभावांचे पंचकृष्ण, महानुभावांचे काव्यग्रंथ, स्थळग्रंथ,

चरित्रग्रंथ, इतिहासग्रंथ इत्यादिंवर अनेक संशोधकांनी परिश्रम केले आहेत व अजूनही संशोधनाची कितीतरी दालने अस्पष्ट आहेत. महानुभावीय स्फुटरचनांचे अध्ययन अद्यापपावेतो झालेले नाही. किंबहुना महानुभावाच्या पराभवाचे रहस्य सांगताना महानुभावांचे स्फुट वाङ्मय नसल्याने या पंथाचा ऱ्हास झाला, अशी कारणमीमांसा केली जाते ती यामुळेच. महानुभावीय स्फुट रचना पंचकृष्णप्रीतीतून आणि नित्य नैमित्तिक, दैनंदिन भक्तीभावातून साकारलेली आहे. ही स्फुट वाङ्मय सरिता अनेकविध स्तरातून आणि वाङ्मयीन पदरातून निर्माण झालेली आहे. महानुभावांची स्फुट रचना इतकी विपुल, सकस आणि समृद्ध आहे, की स्फुट वाङ्मयावर स्वतंत्रपणे अभ्यास करणे मला गरजेचे वाटले. महानुभाव संप्रदाय अनन्यभक्तीसंप्रदाय असल्याने पंचकृष्णांच्या अवतार कल्पनेतून निर्माण झालेल्या अवतार कृत्यांची स्तुती शब्दातून साकारणे स्वाभाविकच आहे. या स्फुट रचनाकर्त्यांमध्ये म्हाइमभट्ट सारख्या षड्शास्त्र संपन्न पंडितांपासून ते भोळ्याभाबड्या अशिक्षित पण उत्कृष्ट भक्तीभावनेचा स्रोत ज्यांच्या अंतर्यामी वसत आहे, अशा कित्येक अनाम भक्तांच्या लेखणीतून, रचनेतून ही स्फुट वाङ्मयसरिता अनेक अंगांनी समृद्ध झाली आहे. ही अनन्यभक्ती साकारताना कधी नामस्मरणातून तर कधी लीळा स्मरणातून तर कधी उपदेश चिंतनातून आणि मूर्तिचिंतनाद्वारा प्रस्फुटित झालेली आहे. त्यामुळे या स्फुट वाङ्मयाच्या अभिव्यक्तीचे वेगवेगळे पदर न्याहाळणे क्रमप्राप्त ठरले. त्यातील आरत्या, धावे, स्तोत्रकाव्ये, चौपद्य, लोकगीते, रुपक, काव्ये, पोवाडे, भारूडे, श्लोकबद्ध काव्यरचना, चित्रकाव्यरचना यासारखी चमत्कृतीपूर्ण रचना अशी पद्याची अनेक दालने या साहित्याने सधन झालेली आहेत.

पंचकृष्ण प्रीतीच्या प्राणतत्त्वाने पद्यबद्ध झालेला आविष्कारच फक्त मी अभ्यास करण्यासाठी निवडला होता. महानुभावीय गद्यरचनेसोबतच महानुभावांची पद्यरचनाही किती समृद्ध आहे पण ती अनुपलब्ध असल्याने त्याविषयी गैरसमज प्रसृत आहेत. माझ्या या प्रबंधाने या गैरसमजांचे बरेचसे धुके विरल होतील, याची मला खात्री वाटते. माझ्या अभ्यासामुळे महानुभाव पंथ आणि महानुभावीय स्फुट रचना यावर नव्याने प्रकाश पडलेला आहे. कारण अनुपलब्ध काव्ये उपलब्ध करून त्यांची संहिता परिशिष्टातून नोंदवलेली आहे व उपलब्ध काव्याचे वाङ्मयीन विवेचन या प्रबंधातून मी निवडले आहे.

महानुभाव साहित्याच्या अभ्यासास सुरुवात करताना, या वाङ्मयाच्या दृष्टीने महत्त्वाची आणि पहिली अडचण ती म्हणजे पंथाच्या वाङ्मयाच्या लिप्या ही होय. अनेक लिप्यांमधून लिपीबद्ध झालेले भरपूर वाङ्मय अप्रकाशित आहे हे अभ्यास करताना शोधयात्रेच्या वेळी लक्षात आले. लिपीचा अडसर नाहीसा करण्यासाठी माझ्या मार्गदर्शकांच्या द्वारे काही लिप्यंतरकार शोधले व त्यांच्या सहकार्यावर या अडचणींवर मात करणे मला सोपे झाले. खरे पाहता महानुभाव वाङ्मय क्षेत्रात यापूर्वी डॉ. य. खु. देशपांडे, ह. ना. नेने, नि. व. भवाळकर, अ. का. प्रियोळकर, डॉ. वि. भि. कोलते, डॉ. यू. म. पठाण, डॉ. व. दि. कुलकर्णी, डॉ. व. दा. कुलकर्णी, डॉ. शं. गो. तुळपुळे, डॉ. सुरेश डोळके, डॉ. रा. चिं. ढेरे यांच्यासारखी व्यासंगी मंडळी समोर असताना माझा प्रयत्न फलदायी होईल का याची शंका होती. पण माझे

मार्गदर्शक डॉ. कन्हैया कुंदप यांनी मला धीर देऊन अभ्यासाच्या दिशा दर्शविल्यामुळे स्फुट काव्यरचनांचा अभ्यास करणे मला शक्य झाले.

महानुभावीय स्फुट वाङ्मयामध्ये गद्यरचनेसोबत पद्यरचनाही समृद्ध व विपुल आहे, हे लक्षात आल्यामुळे जाणीवपूर्वक महानुभावीय स्फुट काव्यरचनांचा अभ्यास, अशी मर्यादा घालून घेऊन या अभ्यासाला प्रारंभ केला. महानुभावीय स्फुट गद्यरचनांच्या अभ्यासावर वेगळ्या रीतीने अजूनही संशोधनात्मक अभ्यास होऊ शकतो, असे मला वाटते.

या अभ्यासाला सुरुवात करताना या सर्व काव्यरचनांच्या मुळाशी पंचकृष्णांची परमभक्ती हे सूत्र लक्षात घेऊन महानुभावीय तत्त्वज्ञानाचा या काव्यरचनांवर असलेला प्रभाव पाहणे क्रमप्राप्त ठरले.

महानुभवावीय काव्यरचनांचा अभ्यास करण्यासाठी महानुभाव संप्रदायाची सांप्रदायिक आणि वाङ्मयीन पूर्वपीठिका समजून घेण्यासाठी पहिल्या प्रकरणातून हा इतिहास समृद्धपणे या अभ्यासातून मी मांडला आहे. त्यानंतर या स्फुटकाव्य रचनांची प्रेरणा शोधून या महानुभावीय काव्यरचनेचे स्वरूप कसे विविधांगी आहे, हे दुसऱ्या प्रकरणातून मी मांडले आहे.

महानुभावांच्या स्फुट वाङ्मयातील खरा गाभा म्हणजे आरती लेखन होय. यासाठी तिसऱ्या प्रकरणातून महानुभावीय आरतीचे स्वरूप स्पष्टपणे लक्षात यावे यासाठी महानुभावांच्या विविध सुमारे दीडशे आरत्यांची संहिता प्रयत्नपूर्वक तयार केलेली आहे. आरत्यांच्या संहितेचे एक स्वतंत्र परिशिष्ट प्रबंधाशी निगडीत केले आहे. महानुभावांचे आरती संग्रह उपलब्ध नसल्यामुळे मी केलेली संहिता ही सांप्रदायिक आणि तत्त्वज्ञानाच्या दृष्टिकोनातून एक मोलाची संहिता असल्यामुळे ती या प्रबंधाचे खास अंग बनली आहे. या संहितेच्या संपादनासाठी मला अनेक महानुभावांनी जे महान सहकार्य केले आहे ते शब्दातीत आहे. या संहितेला केंद्रिभूत मानून महानुभावांच्या आरतीचे स्वरूप आणि अभिव्यक्तीचा रूपविचार मी माझ्या प्रकरणातून समर्थपणे मांडला आहे. आजपर्यंतच्या महानुभाव संशोधनातील हा माझा पहिला आणि अनोखा प्रयत्न आहे, की ज्यामुळे मराठी सारस्वतास एक वेगळे परिमाण लाभेल, याची मला खात्री वाटते.

महानुभाव आरती सोबतच महानुभावांची स्तोत्रकाव्य मला उपलब्ध झाली. या स्तोत्रकाव्याची एक समृद्ध संहिता मी परिशिष्टातून नोंदविलेली आहे आणि त्या परिशिष्टाच्या आधारे महानुभावीय स्तोत्रकाव्याचा पंचकृष्ण अनन्य भक्तीशी असलेला अनुबंध स्पष्ट केलेला आहे. या स्तोत्रकाव्याचे बारकाव्याने निरीक्षण करून महानुभावांची स्तोत्रकाव्ये ही मराठीतील स्तोत्रकाव्याची आद्यभूमी कशी आहे? हे दर्शविण्याचा प्रयत्न केलेला आहे. महानुभावांची स्तोत्रे सुद्धा अशीच एकत्र सलगपणे कोठेही उपलब्ध होत नाहीत. त्यामुळे त्यांची एकत्र उपलब्धी संहितेच्या रूपाने करून त्याचे केलेले विश्लेषण हाही माझ्या प्रबंधाचा महत्त्वाचा विशेष आहे, असे मानावे लागेल.

महानुभाव रूपक काव्ये ही आध्यात्मिक रूपककाव्ये आहेत आणि त्या रूपककाव्यामुळे मराठीतील रूपक काव्यरचनेला, मराठीतील निर्यमक रचनेला कालक्रमदृष्ट्या अगोदर सुरुवात झाली होती याचे भान अध्यात्मिक रूपक काव्यावरून सहज सजग होऊ शकते.

महानुभावांची पदे आणि धुवे हे संगीताची परंपरा असणारे काव्य, महानुभावांचे भक्तीसंगीत

म्हणून आजपर्यंत दुर्लक्षितच होते आणि त्यामुळे स्त्रीगीताचा प्रारंभ हाही महानुभाव काव्याकडेच जातो, याचाही चिकित्सकपणे मी अभ्यास केलेला आहे. महानुभावांच्या काव्यनिर्मितीत, चित्रकाव्यनिर्मिती हा त्या काळाचा कदाचित युगधर्म असावा हे 'आयमुनी कारंजकर' आणि 'आनेराजवासांच्या 'सुभाषितांताक्षरी'वरून लक्षात येते. आजच्या दूरदर्शनवर असलेल्या अंताक्षरीचे प्रारंभस्थान महानुभावीय काव्यरचनेमध्ये आलेले पाहून नवल वाटते.

या सर्व स्फुटकाव्य रचनांतून प्रकटणाऱ्या तत्त्वज्ञानाचा मागोवा घेणे हे जसे क्रमप्राप्त होते, तसेच स्फुट काव्यरचनेतून प्रकट होणारे समाजदर्शन हा अनुषंगाने येणारा भाग मी साकल्याने तपशीलासह मांडला आहे आणि महानुभावीय काव्यरचनांचे वाङ्मयीन मूल्यमापन प्रबंधातून घडविलेले आहे. याप्रमाणे या स्फुट काव्यरचनांनी मराठी साहित्याला समृद्ध केले आहे. आपल्या पूज्य वंदनीय ईश्वरी अवतारांचे स्मरण, स्तवन करण्याच्या प्रेरणेतून जरी स्फुटकाव्याची निर्मिती झाली असली तरी त्याला एक वाङ्मयीन दर्जा लाभला आहे आणि या वाङ्मयीन स्तराला सांप्रदायिक, पंथीय तत्त्वज्ञानाचे आणि वाङ्मयीन भाषिक असे महत्त्व प्राप्त झाले आहे. याप्रमाणे स्फुट काव्यरचनांचा अभ्यास चिकित्सकपणे आणि संहितासहित मांडण्याचा प्रयत्न केला आहे. शेवटी परिशिष्टेही जोडली आहेत. ही सर्व परिशिष्टे महानुभावांच्या मूळ हस्तलिखित बाडातून लिप्यांतरीत करून घेतल्यामुळे ती आपापल्यापरीने स्वयंपूर्ण, स्वतंत्र आणि प्रकरणांशी निगडीत अशी आहेत. ठराविक मर्यादा राखून अभ्यासाच्या परिपूर्णतेसाठी ही परिशिष्टे मूळ प्रकरणाशी निगडीत असल्यामुळे त्यांचाही एक विशिष्ट असा दर्जा आहे. याप्रमाणे या शोध प्रकल्पाचे स्वरूप स्वतंत्र, वैशिष्ट्यपूर्ण आहे. आजपर्यंत दुर्लक्षित राहिलेल्या स्फुट काव्यरचनांचा समृद्ध अभ्यास करण्याचा प्रयत्न या प्रबंधातून केला आहे. विस्तारभयास्तव महानुभावीय स्फुट गद्य रचनांचा अभ्यास मला करता आला नाही याची रुखरुख वाटते. कदाचित महानुभावीय स्फुट गद्यरचनांच्या अभ्यासासाठी महानुभाव वाङ्मय संशोधकांची वाट पहात आहे एवढे मात्र निश्चित ! ❑

डॉ. दीपा देशपांडे

'अद्वैत', मंत्री कॉलनी, इस्लामपूर, ता. वाळवा, जि. सांगली. दूरध्वनी : (०२३४२) २३१२९

---

## स्वागत

- ❑ **श्री ललित रामायण :** डॉ. प. ज. हरिदास, मालती प्रकाशन, नागपूर, ३३६
- ❑ **निवडक भाषा आणि जीवन :** कल्याण काळे, मृणा शहा, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठे २९५
- ❑ **प्रेमाची गोष्ट :** शाम मनोहर, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठे १०६
- ❑ **अंतरीच्या गूढगर्भी :** अनुराधा फाटक, मनोदय प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ७८
- ❑ **शततारका :** वसंत बापट, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १५०
- ❑ **दर्शन :** शंकर वैद्य, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ९१
- ❑ **परिदान :** पुरुषोत्तम पाटील, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ६८
- ❑ **स्वातंत्र्यसंग्राम ज्ञात आणि अज्ञात :** वि. स. वाळिंबे, नवचैतन्य प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १९२







# खान्देश साहित्य संमेलन : काही निरीक्षणे

□

शंतनु चिंधडे

मराठी साहित्य संमेलनांचा गतकालीन इतिहास पाहता १९४४ साली श्री. मामा वरेरकरांच्या अध्यक्षतेखाली धुळ्याला आतापावेतो एकमेव अ. भा. स्तरावरचे साहित्य संमेलन झालेले आहे. म्हणजे तब्बल ५५ वर्षांच्या कालावधीनंतर धुळ्यात खान्देश साहित्य संमेलन २० व २१ मार्च १९९९ रोजी साजरे झाले. प्रदीर्घ कालावधीच्या शांततेनंतर खान्देशातील काही साहित्यिकांनी एकत्र येऊन मोठ्या स्तरावरचे संमेलन घ्यावे, असा विचार केला व हा एक संस्मरणीय उपक्रम घडवून आणला. ही एक विशेष घटना समजली पाहिजे.

धुळ्याच्या पांझरा नामक निवांत व प्रसन्न नदीकाठच्या गुरुडबाग परिसरात कलापूर्ण व भव्य मंडपात खानदेश साहित्य संमेलनाला सुरुवात झाली. या सर्व परिसराला 'कविश्रेष्ठ कुसुमाग्रज नगर' हे अत्यंत प्रसंगानुचित असे नाव देण्यात आले होते. २० मार्च ९९, शनिवारच्या सकाळी ग्रंथदिंडीचे आगमन संमेलन मंडपात झाल्यावर उद्‌घाटनाचा सोहळा सुरू झाला. या सोहळ्यापूर्वीच कविवर्य कै. तात्यासाहेब शिरवाडकरांना भावपूर्ण श्रद्धांजली वाहण्यात आली. प्रत्यक्ष कुसुमाग्रजांच्या आवाजातली ध्वनिफित ऐकवण्यात आली व त्यांच्या सुप्रसिद्ध कवितेचे वाचन करण्यात आले. ती कविता होती 'प्रेम कुणावरही करावं...' या श्रद्धांजलीच्या कार्यक्रमाने मंडपात एक भारावलेले वातावरण तयार झाले व पुढील कार्यक्रमांना एक सुंदर पार्श्वभूमी मिळाल्याची जाणीव झाली.

उद्‌घाटनाच्या सकाळच्या पहिल्या सत्रातली सर्व भाषणे आटोपशीर, मुद्देसूद आणि धुळेकर साहित्यप्रेमींचे मन उल्हसित करतील अशीच होती.

स्वागताध्यक्ष आमदार राजवर्धन कदमवांडे यांनी आपल्या छोट्याशा भाषणात साहित्य व सांस्कृतिक क्षेत्रात असणाऱ्या खान्देशच्या योगदानाचा सर्वंकष आढावा घेतला. समर्थ वागूदेवता मंदिर, सरस्वती पाठशाळा, गरुड वाचनालय, राजवाडे संशोधन मंदिर, गांधी तत्त्वज्ञान मंदिर, का. स. वाणी मराठी प्रगत अध्ययन केंद्र अशा महत्त्वाच्या नव्या-जुन्या संस्थांच्या कार्याचा त्यांनी थोडक्यात परामर्ष घेतला. कवयित्री बहिणाबाई चौधरी, कवी सोपानदेव, कवी दु. आ. तिवारी, काव्य रत्नावलीकार फडणवीस, वारकरी संप्रदायाचे कवी पळशीकर तसेच बालकवी ठोंबरे, कविवर्य बाळ सीताराम मर्ढेकर आदि मान्यवराचं वास्तव्य व या भूमीला झालेला परिसस्पर्श आदि गोष्टींचा साभिमान उल्लेख

त्यांच्या भाषणात होता.

धुळ्याच्या कारागृहातील आचार्य विनोबांचे वास्तव्य व तेथे त्यांनी केलेली गीताप्रवचने, कै. सानेगुरुजींनी लेखनाचे केलेले अलौलिक कार्य, कै. गिरीजाबाई केळकरांचे धुळे-जळगावातील वास्तव्य व तेथले त्यांचे क्रांतिकारी लेखन, आंतरराष्ट्रीय कीर्तीचे शिल्प, चित्रकार कै. केकी मूस, ल. नी. छापेकर, कांतीलालजी गुजराती वगैरे श्रेष्ठ व्यक्तींच्या कार्याचा गौरवपर शब्दात आढावा हे आमदारसाहेबांच्या व्याख्यानाचे वैशिष्ट्य म्हणावे लागेल.

संमेलनाचे उद्‌घाटक म्हणून 'पानिपत'कार श्री. विश्वास पाटील यांच्या उपस्थितीने संमेलनात एक वेगळेच चैतन्य जाणवत होते. श्री. पाटील यांचे भाषण समयोचित व उत्स्फूर्त झाले. त्यांच्या भाषणात काही महत्त्वाचे मुद्दे होते : 'लेखकाला कथा, कादंबरी, कविता असा कोणताही वाङ्‌मयप्रकार लिहिण्यासाठी उपलब्ध असला तरी त्याला आपला मार्ग स्वत:च शोधावा लागतो. दृष्टिपथात येणाऱ्या बदलांना संशोधन व अभ्यासाची जोड देऊन साहित्य निर्मिती होणे महत्त्वाचे असते.

'नाट्य शिबिराप्रमाणेच साहित्याच्या प्रवाहात नव्यानेच सहभागी होणाऱ्यांसाठी कथा, कविता, कादंबरी यांच्या जडणघडणीसाठी मार्गदर्शक शिबिरे घेतली पाहिजेत. उत्तम साहित्यकृती सादर केली तर वाचक तीवर खरोखर तुटून पडतात. हे अनेकवेळा सिद्ध झाले आहे. जीवनातील विसंगती मांडताना त्यात प्रतिभेचा स्पर्श असणे आवश्यक आहे. मराठी माणूस त्याच्या गरजा आणि हव्यासामागे लागल्यामुळे उत्कृष्ट साहित्यनिर्मिती करू शकत नाही. दलित साहित्यिकांनी यापुढील काळात कादंबरी निर्मितीकडे लक्ष द्यावे. नव्या नगर वसाहतींमध्ये वाचनालयांना स्थान असणे अत्यावश्यक ठरवले गेले पाहिजे. मराठी ही समृद्ध भाषा असून खेड्यापाड्यातून निर्माण झालेला वर्गच मराठीभाषेला वाचविणार आहे. तो मराठी भाषेचा झेंडा अटकेवर लावल्याशिवाय राहणार नाही.' वगैरे विचारांनी श्री. पाटील यांनी श्रोत्यांवर उत्तम रीतीने प्रभाव पाडला.

महाराष्ट्र टाईम्सचे श्री. अशोक जैन तथा 'कलंदर' हे संमेलनातले एक खास आकर्षण होते. आपल्या खास नर्मविनोदी शैलीत त्यांनी 'ठिकठिकाणी साहित्य संमेलने व्हावीत की होऊ नयेत हा वादाचा विषय आहे, मात्र जागतिक वाङ्‌मयात मराठी साहित्य कुठे आहे, त्याचा शोध व बोध घेण्याची गरज आहे.' असा मुद्दा उपस्थित केला. मराठी कवींचे वाढलेले उदंड पीक पण त्यामानाने घसरणीला लागलेली एकूण मराठी कविता, साहित्य संमेलनातून दिसणारी कवींची लाचारी वगैरे बाबतीत त्यांनी खरमरीत टीका केली. कोणाला आवडो ना आवडो मात्र श्री. जैन यांच्या भाषणात एकूण मराठी वाङ्‌मयाच्या संदर्भात तळमळ प्रकट होत होती, हे नक्कीच.

श्री. जैन यांचेच हस्ते 'खान्देश अक्षरा' या छोटेखानी पण अंतर्बाह्य आकर्षक स्वरूपाच्या स्मरणिकेचे प्रकाशन करण्यात आले.

प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित असलेल्या श्री. रवींद्र पिंगे, डॉ. वि. भा. देशपांडे, डॉ. शंतनू चिंधडे यांनी थोडक्यात समयोचित असे आपले विचार व्यक्त केले. मराठीचे निवृत्त प्राध्यापक व कवी राजा महाजन यांचे











अध्यक्षीय भाषण अत्यंत मुद्देसूद, ओघवत्या भाषेत आणि अहिराणी बोलीभाषेतील रसाळ काव्यपंक्तींची रेलचेल असलेले होते. अध्यक्षीय भाषणात प्रा. महाजन म्हणाले,

'हा भूप्रदेश अहिराणी लोकसंस्कृतीचा व आदिवासी संस्कृतीचा गाभा आहे. खान्देश लोकसंस्कृतीचा विविधांगी बहर या भूप्रदेशात पहायला मिळतो. अहिराणी बोलीत 'धुळे' याचा उच्चार 'धुये' होतो. संस्कृत भाषेत 'धू' या क्रियापदाचा अर्थ आहे, 'जोडणे', 'जुंपणे', 'पुढे जाणे' वगैरे. म्हणजे एका अर्थी स्वच्छ, शुभंकर असे हे शहर व दुसऱ्या अर्थी अग्रेसर असणारे. अशा या शहरात दीर्घ कालानंतर संपन्न होणारे हे संमेलन सुखदायी व अविस्मरणीय ठरावे...'

आपल्या भाषणात त्यांनी खान्देशची परंपरा, खान्देशी लोकसाहित्य काव्य रत्नावलीचे कार्य, आधुनिक परंपरा, साठोत्तरी काळ, साहित्य विश्वातील प्रदूषण व मराठी भाषा कशी टिकेल अशा महत्त्वाच्या विविध मुद्यांवर मार्मिक विचार मांडले.

स्कंद देश, आभीर देश, गोपराष्ट्र, खांडव देश, खंडदेश, कानदेश, खालदेश, कान्हदेश, खान्देश अशा विविध नावांनी प्रदीर्घ काळापासून ओळखल्या जाणाऱ्या या भूमीची कला साहित्य परंपरा त्यांनी अभ्यासपूर्णरीत्या विशद केली. प्राचीन काळापासून अभीरांची म्हणजे अहिरांची म्हणून ही भूमी ओळखली जाते. अहिरांची वाणी-बोली-ती अहिराणी हा सिद्धांत सर्व संशोधकांनी मान्य केला आहे. अहिराणी ही मराठीपेक्षा प्राचीन व स्वतंत्र बोली ठरते, असा एक महत्त्वाचा मुद्दा त्यांनी मांडला. अहिराणी भाषेतून व्यक्त झालेले खान्देशी लोकसाहित्य विपुल असून ते वैशिष्ट्यपूर्ण आहे. हे लोकसाहित्य आजच्या ललित लेखक, कवींना निश्चितच प्रेरणास्तोत ठरेल. साहित्यात वऱ्हाड, मराठवाडा, कोकण विपुल प्रमाणात व्यक्त झाले आहे. मात्र त्या तुलनेने खान्देश मुळीच नाही, ही खंत त्यांनी व्यक्त केली.

खान्देशातले आणखी एक मौलिक कार्य म्हणजे 'काव्यरत्नावली व तिचे कार्य' प्रा. महाजनांनी या कार्याची विस्तृत ओळख श्रोत्यांना करून दिली. 'जळगावात नारायण नरसिंह फडणवीस उर्फ नानासाहेब यांनी उत्स्फूर्तपणे काव्याला वाहिलेले हे मासिक १८८७ साली प्रथम प्रकाशित केले. तब्बल ४८ वर्षे ते चालले. रविकिरण मंडळाच्या परंपरेतल्या अनेक कवींना व त्या काळातील अन्य कवींना रत्नावलीतून प्रसिद्धी मिळत गेली. ४८ वर्षांत एकूण ४५४ अंक प्रसिद्ध झाले. दहा हजार पंचेचाळीस पृष्ठे छापली गेली. ६४९ कवींच्या कविता त्यात छापल्या गेल्या व एक लाख ८३ हजार कवितांना प्रसिद्धी मिळाली.

'आधुनिक मराठी साहित्यात जे प्रवाह निर्माण झाले त्याचे थोडे प्रतिबिंब खान्देशात निर्माण झालेल्या साहित्यातही दिसून येते. जीवनाच्या प्रत्येक क्षेत्राप्रमाणे आज साहित्य क्षेत्रातही 'प्रदूषण' झालेले दिसून येते. प्रतिष्ठा, पदप्राप्ती, प्रसिद्धी आणि संपत्तीलाभ ही साहित्य निर्मितीची प्रेरणा, प्रयोजने ठरू लागलीसे दिसते. साहित्यिक हा ग्रंथजीवी, साहित्यजीवीच राहिला पाहिजे, चांगल्या साहित्य निर्मितीसाठी निरीक्षणशक्ती, चिंतनशक्ती, अभिव्यक्तीक्षमता यांची प्रतिभा स्पर्शित जोपासना, साधना केली पाहिजे. वगैरे

विचार नव्या लेखकांना नक्कीच अंतर्मुख करणारे होते.'

मराठी भाषा कशी टिकेल असा आणखी एक मुद्दा प्रा. महाजनांनी चांगल्या रीतीने मांडला. 'याबावतीत पुण्या-मुंवईला परिषदा, परिसंवाद भरवले जातात. माझ्या मते हे उपाय उथळ, सवंग, अप्रस्तुत होत. प्रमाण भाषा जिवंत, रसरशीत , सुघटित, सौंदर्यपूर्ण, सुंदर राहण्यासाठी आधी बोलीभाषा जिवंत राहिल्या पाहिजेत. महाराष्ट्रातील बोलीभाषा जिवंत राहिल्या तरच मराठी भाषा जिवंत राहील. वोली भाषेबद्दलं रास्त अभिमान बाळगून तिचे संरक्षण, संवर्धन व जास्तीत जास्त उपयोजन केले पाहिजे. वोलीभाषेतील लोकसाहित्य, वोली भाषेतील लिखित साहित्य यामुळेच एकंदर मराठी साहित्य समृद्ध होणार आहे.' खास खान्देशी आर्जव व शैलीत कवितांचे चरण उधृत करून प्रा. महाजनांनी अख्या मांडवात बहारदार वातावरण निर्माण केले.

उद्घाटन समारंभानंतर दुपारच्या सत्रात प्रकट मुलाखत, खान्देशी संस्कृती व साहित्य या विषयावर परिसंवाद, रात्री नव्या-जुन्या कवींचे कविसंमेलन आनंद-उल्हासात सादर झाले.

रविवारी सकाळी पुन्हा उर्वरित कवींचे कविसंमेलन साजरे झाले. दोन्ही कविसंमेलनातून सुशील पगारिया, नारायण कुलकर्णी-कवठेकर, उत्तम कोळगावकर, जगदीश देवपूरकर, अनिल कांबळे, घन:शाम धेंडे, अरविंद भुजवळ, मधु साळुंके, शंतनू चिंधडे, पुरुषोत्तम पाटील, नारायण शिरसाळे, भगवान ठाकूर, वहारु सोनवणे, अनिल सोनार, धों. वे. जोशी, देवकीनंदन सारस्वत, सुषमा गरुड वगैरे प्रथितयश कवींचा सहभाग होता व रसिकांना चांगल्या कविता या मंडळींनी ऐकवल्या. प्रभा सोनवणे, ज्योत्स्ना चांदगुडे, स्वाती सामक, कृष्णा पोतदार, डी. वी. जगत्पुरिया, राजा मिसर, प्रभाकर महाजन, वाळकृष्ण सोनवणे वगैरे काव्यक्षेत्रात स्थिर होऊ घातलेली मंडळी आपल्या कवितांना दाद घेऊन गेली.

संमेलनाच्या अखेरच्या सत्रात महत्त्वाचे ठराव संमत झाले. प्रामुख्याने उत्तर महाराष्ट्र विद्यापीठास कै. सानेगुरुजी हे नाव द्यावे, या निमित्ताने 'खान्देश साहित्य परिषद' स्थापन करावी, जिल्हा साहित्य संघ स्थापन करावा, नगरपालिकांनी व जिल्हा परिषदांनी स्थानिक साहित्यिकांची पुस्तके खरेदी करावीत वगैरे मुद्दे होते.

दोनही दिवस संगीत, भजनादि सांस्कृतिक कार्यक्रम योजले होते. या सर्व कार्यक्रमांना साहित्य संगीत प्रेमींची उत्तम उपस्थिती होती.

या निमित्ताने या शहरातील सांस्कृतिक मरगळ काही प्रमाणात नक्कीच दूर झाली, अशा विचाराने प्रतिनिधी घरोघरी परतले.

❑

(डॉ.) शंतनू वसंत चिंधडे
९/११४६, सूश्री, लकाकी मार्ग, पुणे ४११ ०१६.

---

**स्वागत**

❑ **गुलाम आणि इतर कथा :** वसुधा पाटील, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठे २००

❑ **गौतमांची गोष्ट :** अनिल दामले, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठे २०१

❑ **स्वराजपाल बियॉंड बाऊंड्रीज :** अनुवाद-मंजिरी दामले, अमेय प्रकाशन, पुणे, पृष्ठे १९१

# आगळावेगळा — कविता महोत्सव १९९९

श्रीकांत चौगुले

*महाराष्ट्राची सांस्कृतिक राजधानी म्हणून संबोधल्या जाणाऱ्या पुणे नगरीत, साहित्यविषयक उपक्रम राबविणाऱ्या अनेक संस्था आहेत. त्यातल्या त्यात काव्यविषयक, म्हणजेच नवोदित अथवा मान्यवरांच्या कविसंमेलनांचे सातत्याने आयोजन करणाऱ्याही संस्था आहेत; पण नवोदित, मान्यवर व समीक्षक यांना एकाच व्यासपीठावर आणून प्रचलित कविसंमेलनाबरोबरच कवितांचा संगीतमय कार्यक्रम, परिसंवाद, मुलाखत याद्वारे कविता, कवी आणि रसिक यांना जोडणारा आगळावेगळा कविता महोत्सव गतवर्षीप्रमाणेच यावर्षीही दि. १३ व १४ मार्च ९९ रोजी पुण्यातील ॲम्फी थिएटर, फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे येथे प्रेरणा साहित्यकला प्रतिष्ठान पुणे यांनी आयोजित केला होता. त्यासंबंधी विशेष —*

या महोत्सवाचे उद्घाटन ज्येष्ठ अभिनेते विक्रम गोखले यांनी केले. त्यावेळी मोजक्या शब्दात पण नेटके विचार मांडताना ते म्हणाले, 'मराठी कवितेला फार मोठी परंपरा लाभली आहे. पण खरी मराठी कविता जगवायची असेल तर सामाजिक भान ठेऊन कविता लिहिली गेली पाहिजे.' तर आपल्या अध्यक्षीय भाषणात संत साहित्यापासून आजच्या आधुनिक मराठी कवितेपर्यंत आढावा घेत आजच्या नवोदित कवींना मार्गदर्शन करताना प्रा. शंकर वैद्य यांनी 'कवितेच्या कलात्मक चौकटीतून, मूल्य मांडताना नवकवींनी कवित्वाचे भान तपासून घेणे गरजेचे आहे.' असा मौलिक विचार मांडला. याप्रसंगी स्वागताध्यक्ष गुलाब विरदवडे यांनी उपस्थितांचे स्वागत केले. तर प्रतिष्ठानचे अध्यक्ष अरविंद भुजबळ यांनी प्रास्ताविक केले. त्यानंतर कवितांचा संगीतमय कार्यक्रम 'मंतरलेले सूर नवे' यामध्ये अरविंद भुजबळ, मलिक नदाफ, मीनल बाठे आदी कवींच्या रचना दयानंद घोटकर, भाग्यश्री भंडारे, अशोक काळे या कलाकारांनी सादर केल्या. या कार्यक्रमाच्या दरम्यानच अर्धा तास वीज खंडित झाली. तरीही पुणेकर रसिकांनी कार्यक्रम तसाच पुढे चालू ठेऊन, ऐन उकाड्यात तेही अंधारात मुलायम स्वर झेलत मनापासून दाद दिली.

दुसऱ्या दिवशीच्या पहिल्या सत्रात नवोदितांच्या काव्यवाचन स्पर्धेत ६० कवींनी सहभाग घेतला होता. त्यांनी आपल्या रचना वेगवेगळ्या पद्धतीने सादर केल्या. त्यामध्ये काही सामाजिक भान असणाऱ्या सहजसुंदर










रचनाही ऐकायला मिळाल्या. या स्पर्धेसाठी संजय चौधरी व मीरा शिंदे यांनी परीक्षक म्हणून काम पाहिले. तर डॉ. कल्याण इनामदार व अरुण म्हात्रे यांनी शेवटी नवोदितांना मार्गदर्शन केले. त्यानंतर निवेदक श्रीकांत चौगुले यांनी प्रा. शंकर वैद्य यांची प्रकट मुलाखत घेतली. त्यामध्ये वैद्यांनी आपल्या लेखनाची सुरुवात, शालेय जीवनातील पोषक वातावरणात आणि त्यानंतरच्या काळात लाभलेले अनेकांचे मार्गदर्शन, मान्यवरांचा सहवास याबरोबरच गीतलेखनाची पार्श्वभूमी व आपल्या कवितासंग्रहाबद्दल बोलताना नवोदितांनी कवितासंग्रहासाठी घाई न करता, चांगले भान आल्याशिवाय आणि ते कवितेतून व्यक्त झाल्याशिवाय संग्रह प्रकाशित करण्याच्या मागे लागू नये' असा सल्लाही दिला.

तर दुपारच्या सत्रातील 'आधुनिक मराठी कवितेचे सामाजिक योगदान' या परिसंवादात बोलताना प्रा. सुजाता शेणई यांनी 'आधुनिक' ही संज्ञा अतिशय संमिश्र, गतिमान आणि लवचिक आहे, हे मांडतानाच आधुनिक मराठी कवितेचा उगम केशवसुतापासून झाल्याचे कथन करून, मर्ढेकर आणि त्यानंतर साठोत्तरी कवितेतील दाखले देत सामाजिक योगदान स्पष्ट केले. तर भगवान ठग यांनी हे साफ नाकारून सामाजिक कवितेची सुरुवात महात्मा फुले यांच्यापासून झाल्याचे व्यक्तिगत विधान करून विचार मांडले. तर नारायण सुमंत यांनी अलिकडच्या काळातील ग्रामीण श्रमिकांच्या जीवनातील उणीवा व्यक्त करणाऱ्या कवितांचे दाखले देत आपले विचार मांडले. तर श्रीकांत कुलकर्णी यांनी बालसाहित्याचा आढावा घेत मराठी कवितेत प्रतिबिंबित झालेल्या समाज जीवनाचे दाखले देत आपले विचार मांडले. अध्यक्ष प्रा. नागनाथ कोत्तापल्ले यांनी ग्रामीण, दलित, विद्रोहवादी कवितांचा उल्लेख करीत मराठी साहित्यात आधुनिक मराठी कवितेचे फार मोठे सामाजिक योगदान असल्याचे मत व्यक्त केले.

संध्याकाळच्या सत्रात तर मान्यवरांच्या कविसंमेलनाने चांगलीच रंगत आणली. त्यामध्ये रामदास फुटाणे, अरुण म्हात्रे, इंद्रजीत भालेराव, संजय चौधरी, ज्ञानेश्वर कोळी, म. भा. चव्हाण, अनिल कांबळे, इलाही जमादार, प्रकाश पाठारे, प्रशांत मोरे, अरविंद भुजबळ आदी कवींनी आपल्या रचना सादर केल्या. त्याला रसिकांकडून भरभरून दाद मिळाली. या दरम्यान प्रेरणा पुरस्काराचे वितरण महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांच्या हस्ते झाले. त्याप्रसंगी ते बोलताना म्हणाले, 'परंपरेविरूद्ध बोलताना त्यातून वादंग निर्माण होते. त्यातून नवा विचार पुढे आला पाहिजे, त्यातूनच नवी दिशा मिळाली पाहिजे. शेवटी अशा महोत्सवातूनच मराठी कवितेची नाडी दिसून येते. त्यामुळे महोत्सव वारंवार आयोजित केले पाहिजेत.' असे गौरवोद्गार त्यांनी काढले. संत साहित्याचे अभ्यासक डॉ. रामचंद्र देखणे यांचेही याप्रसंगी भाषण झाले आणि या दोन दिवस चाललेल्या व काव्यरसिकांना पर्वणी ठरलेल्या आगळ्यावेगळ्या कविता-महोत्सवाची सांगता झाली.

□

श्रीकांत चौगुले (कार्यवाह)
११, प्रेमराजसदन, आनंदनगर,
सांगवी, पुणे ४११ ०२७.










# काव्यानंद

□

प्रभा सोनवणे

*पत्रिकेच्या गेल्या काही अंकांत 'काव्यानंद' या सदरात विविध कवि-कवयित्रींच्या कवितासंग्रहांचा अगदी थोडक्यात परिचय करून दिला. हे सदर वाचकांना आवडले. कवितासंग्रहाचे विस्तृत परिचय करून द्यावेत असाही काहींचा विचार समजला. एकूणच प्रकाशित होणाऱ्या कवितासंग्रहांचे प्रमाण मोठे असल्याने प्रत्येक अंकात चार-पाच कवितासंग्रहांचाच परिचय अगदी थोडक्यात करून देणे योग्य ठरते.*

*कवयित्री प्रभा सोनवणे यांनी करून दिलेला हा नव्या कवितासंग्रहांचा परिचय —*

---

**ग्रामीण स्त्रीच्या आत्मभानाचे काव्य**

'कुळंबिणीची कहाणी' हा इंद्रजित भालेराव यांचा काव्यवाचनाचा नितळ आनंद देणारा काव्यसंग्रह. एकूण बावीस तुकड्यांमध्ये कवीने कुणबिणीची कहाणी सांगितली आहे. त्यासाठी काही दंतकथांचाही वापर केला आहे.

इंद्रजित भालेराव हे नव्या पिढीतल्या कवींमधलं आघाडीचं आणि लोकप्रिय नाव !

त्यांच्या संग्रहाबद्दल आपल्या अभिप्रायात दि. पु. चित्रे म्हणतात, 'लोकवाङ्मयाचा उपजत रेखीवपणा, मायबोलीचा थेट जिव्हाळा, अध्यात्माच्या क्षितिजाला जाऊन भिडलेली ऐहिकता, माणूस जन्मातल्या मूळ सुखदु:खाची खोल जाण यातून या दीर्घकवितेची निर्मिती झाली आहे.'

'आम्ही कावाडाचे धनी' या दीर्घकवितेबद्दलचा हा अभिप्राय 'कुळंबिणीची कहाणी'च्या मलपृष्ठावर छापला आहे.

'कुळंबिणीची कहाणी' ही सुद्धा एक दीर्घकविताच आहे. या संग्रहात सासू सुनेला आपल्या जीवनाचा इतिहास उलगडून दाखवते आहे.

'ऐक ऐक सुनवाई<br>
मह्या जल्माची कहानी<br>
कशी चालले जिन्याच्या<br>
जांळातून अनवानी'

असा एका ग्रामीण स्त्रीनं आपल्या सुनेशी साधलेला हा सुसंवाद आहे. ही दीर्घकविता स्त्रीवादी कविता म्हणावी लागेल.

पाचव्यांदा पोरगीची झाली म्हणून आईबापाला नकोशी असलेली ही पोर आजीच्या ममतेमुळे मोठ्या हिंमतीने आयुष्याला सामोरी जाते. कुणब्याची ही पोर स्त्रीत्व जपणारी आहे.

तिच्या आयुष्याचा आलेख कवीनं ग्रामीण ढंगात अष्टाक्षरी छंदात मांडला आहे. सहजसुंदर अशी शब्दकळा कवीच्या लेखणीला लाभली आहे.



अनुक्रमणिका

स्त्रीजीवनाचे अनेक पैलू कवीने यात दाखविले आहेत. सुनेला सासूनं मोकळेपणानं आपल्या आयुष्यातलं गुपित सांगावं ही कल्पनाच नितांत सुंदर आहे.

आपल्या हक्काची जाणीव सुद्धा या कुणविणीला आहे.

*'काय मनून बाईनं*
*घरादाराला सोडावं*
*दारामधी परक्याच्या*
*काय मनून पडावं?''*

अशी खंत ती व्यक्त करते. आपल्या वारसाहक्कासाठी लढणारी स्त्री 'सतीची कहाणी' या शेवटच्या तुकड्यामध्ये कवीने प्रभावीपणे उभी केली आहे. या दंतकथेचा वापर अतिशय सुरेख जमला आहे.

स्त्री जाणिवांची इतकी अप्रतिम अभिव्यक्ती कवीनं करावी ही अभिनंदनीय गोष्ट आहे.

भालेरावांच्या काव्यरचनेत रमणीयत्व आहे. 'आम्ही काबाडाचे धनी' प्रमाणेच 'कुळंविनीची कहानी' लोकप्रिय ठरावी अशीच आहे.

'कुळंविनिची कहानी' : कवी - इंद्रजित भालेराव, प्रतिभास प्रकाशन, परभणी.

□

**श्रद्धा जपणारी : बीजेची कोर**

'बीजेची कोर' हा डॉ. विजया संगवई यांचा तीस कवितांचा संग्रह. या संग्रहात भक्ती, देशभक्ती, निसर्ग, सामाजिक जाणीव, अशा विविध विषयांवरील कवितांचा समावेश आहे.

*'जगद् वंदिनी*
*देवी शारदे*
*विश्व मोहिनी*
*मंगल वर दे'*

असा मांगल्याचा वर कवयित्री मागते. कविता सहज जमून गेलेल्या आणि निरागस आहेत. पारंपारिक भारतीय स्त्रीच्या मनाचं प्रतिबिंब काव्यरचनेत दिसते.

हे स्त्रीमन, भक्तिरसात रंगते, पाना-फुलात, चंद्र-चांदण्यात, निसर्गात रमते.

*'गुलाल भाळी*
*केशर प्याली,*
*पहाट हळुदुली*
*कार्तिकातली !'*

किंवा

*'दिन रातीतुनी*
*सहा ऋतूतुनी*
*फिरे गरगरा*
*सृष्टी पसारा !'*

असे सृष्टीचे वर्णन करताना हळूवार झालेली लेखणी राष्ट्रप्रेमाची प्रखर ज्योतही पेटवते.

*'राष्ट्र गौरव राष्ट्रध्वज*
*अखंड उंच फडकवा*
*भारत भूचे ओज तेज*
*दशदिशात कोंदवा ॥'*

असे म्हणत असतानाच, सद्य परिस्थितीबद्दल खंत व्यक्त करणाऱ्या पुढील ओळी पहा -

*'बेकारी - पर्यायाने दारिद्र्य*
*परिणामी गुन्हेगारी*
*या दुष्ट चक्रात अखंड पिचणाऱ्या*
*शोषित पीडितांच्या दैन्य दुर्दशेवर*
*भोंदु राज्यकर्त्यांच्या पेंढाभरल्या*
*आश्वासनांचा आणि नि:सत्व नेत्यांच्या*
*फेसाळ घोषणांचा वांझ उपचार.....'*

सोनसळी पहाट, तुळस, आश्विन, कार्तिक










असे स्त्रियांचे जिव्हाळ्याचे विषय कवयित्रीलाही भुरळ घालतात. आई-वडील ही कवयित्रीची श्रद्धास्थाने आहेत. त्यांच्यावरच्या कविता 'शिवाची पार्वती' आणि 'दयेचे सागर' आई-वडिलांची महती सांगणाऱ्या. 'मम आशेच्या दिव्यांकुश महातेजा' ही शिवाजीमहाराजांवरची कविता तसेच मेघा पाटकरांविषयीचे गौरवगीतही आहे.

'माय वं लय भूक लागलीया' या कवितेत सामाजिक विषमता आणि दारिद्र्य यांचे हृदयस्पर्शी दर्शन घडते.

'बीजेची कोर' हा संग्रह भारतीय संस्कृती, परंपरा, सणवार या साऱ्यांचं कौतुकगीत आहे. मनातल्या श्रद्धा जपणारी ही काव्यकोर कौतुकास्पद !

'बीजेची कोर': कवयित्री डॉ. विजया संगवई
स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे.

□

**स्त्री जाणिवांच्या कविता**

विजया जहागिरदार यांचा 'स्त्रीनक्षत्र' हा नवीन काव्यसंग्रह. कथा, कादंबरी लेखिका म्हणून विजयाताई सुपरिचित आहेत. कवयित्री म्हणूनही त्यांनी लौकिक मिळविला आहे.

या काव्यसंग्रहाला कवयित्री संजीवनीबाई मराठे यांची प्रस्तावना लाभली आहे. आपल्या प्रस्तावनेत त्या म्हणतात, 'प्रत्येक अंधारल्या मनात लुकलुकणारं नक्षत्र हे स्त्री नक्षत्रच असतं, याची खात्री, असा आत्मविश्वास, असे आत्मतेज या तेजाची साक्ष देणाऱ्या अनेक कविता या संग्रहात पानोपानी आहेत.'

'स्त्रीनक्षत्र'मध्ये एकूण अठ्ठावन्न कविता आहेत. बहुतांशी कविता स्त्री-जाणिवांच्या आहेत. म्हणूनच 'स्त्रीनक्षत्र' हे नाव सार्थ ठरतं.

'अहिल्ये' या कवितेत कवयित्री म्हणते,

*'तुझ्या दगडी उत्तर आयुष्यापेक्षा*
*तुझं पाषाण शिल्प*
*किती जिवंत होतं अहिल्ये...'*

स्त्रीचं सनातन दुःख या कवितांमधून व्यक्त होतं.

*'समज तुला मुक्त केलं*
*तुझ्या भिंतींनी... तुझ्या उंबऱ्यांनी*
*तुला मुक्त केलं तुझ्या घरानं...*
*साऱ्या समाजानं... जगानं...*
*तरी या फितूर पाऱ्याचे*
*अदृश्य विळखे*
*कसे तोडणार आहेस?'*

मातृत्व स्त्रीला संसारपाशात गुंतवून ठेवत असतं. मुलांसाठी ती सारं काही सोसते अशी ही अपत्यप्रेमाची कविता 'स्त्री'.

'बाजार' या कवितेत मोलकरणीची व्यथा मांडली आहे.

स्त्रीच स्त्रीची कशी शत्रू बनते ही वास्तविकता व्यक्त करणारी 'दरोडे' ही कविता विदारक सत्य सांगते.

*'सारं लख्ख उजळत*
*कोपरा न् कोपरा चकचकीत करत*
*ती फिरली घरभर*
*कल्हईच्या कांडीसारखी !*
*तरीही अखेर कळकला संसार !'*

या ओळी मनात घर करून राहतात.

स्त्रीची दुःखं, वेदना कवयित्री नेमकेपणानं शब्दांकित करते.

*'आयुष्याची वीणच बदलवून*
*तिला जन्मभर रडायला लावणारे*
*द्रौपदीचे एक हसणे !'*

'वीण' या कवितेत महाभारताचे दाखले

दिले आहेत. संग्रहात काही ग्रामीण ढंगाच्या रचना, तसेच गीतरचना आहेत. गजल रचना आहेत.

'मेंदी नकोच मागू पांगार येथ आहे
माझ्या फुलाफुलांचा अंगार होत आहे.'
या ओळी अविस्मरणीय.

'स्त्रीनक्षत्र' :
कवयित्री - विजया जहागिरदार
दिलीपराज प्रकाशन, पुणे.

□

**मातीशी नातं सांगणारी कविता**

'गोदाघाट' हा भि. द. उशीर उर्फ रविकिरण यांचा पहिलावहिला कवितासंग्रह. या संग्रहाला महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे अनुदान मिळाले आहे.

काव्यसंग्रहाच्या नावावरूनच कविता गोदावरी नदीच्या परिसरातली आहे, हे लक्षात येते. या काव्यरचनांना कविवर्य कुसुमाग्रजांचे आशीर्वाद लाभले आहेत. या कवितांविषयी कुसुमाग्रज लिहितात, 'यशाच्या व कीर्तीच्या अपेक्षेने ही कविता लिहिलेली नाही. अंत:करणाच्या ऊर्मीतून डोंगरातील झऱ्यासारखी ती स्वाभाविकपणे बाहेर पडली आहे.'

कवी स्वत: आपल्या कवितेविषयी म्हणतो,

*'माझी कविता साधी भोळी*
*माझी कविता मराठमोळी*
*साधीच लेते साडी चोळी*
*रेखीव लावी कुंकू भाळी'*

उशीर यांची कविता अकृत्रिम आहे. त्यात सहजता आहे. सध्या मुंबईसारख्या झगमगत्या महानगरात कवीचे वास्तव्य आहे; पण मन मात्र पूर्वायुष्यातील ग्रामीण भागातच रेंगाळते आहे.

मग ते लिहून जातात -

*'क्षुद्र या पोटासाठी परी*
*साहतो हा दुरावा मी*
*खोल मनामध्ये तरी*
*जपली ती आंबराई'*

कविता रानावनात रमणारी, मातीशी नातं सांगणारी!

शिवाराचं वर्णन करताना गोफण हातात असलेल्या सुंदरीचं मार्मिक वर्णन 'का म्हणू राजहंसिनी' या कवितेत आहे.

*'गहू, हरभरा, मका, जोंधळा*
*फुलून आला मळा मळा*
*भर दुपारी चंद्र उगवला*
*भुरळ पाडितो मना...'*

शहरी संस्कृतीचं दर्शनही काही कवितांमध्ये येतं. पण शहरातल्या रुक्ष व्यवहारी जगात कवीची लेखणी फार रमत नाही.

*'सिमेंटच्या झाडांचा प्रदेश'*

या शेवटच्या कवितेत ती खंत कवीने व्यक्त केली आहे —

काही लोक त्याला बारमाही पैशाचा प्रदेश असेही म्हणतात.

*'येथील रात्री नशील्या असतात*
*ते फक्त व्यापार करतात*
*माणसांचा !'*

उशीर यांची कविता प्रांजळ आणि सच्ची आहे. त्यांचा पुढील संग्रह अधिक प्रगल्भ असेल, अशी आशा व्यक्त करते.

'गोदाघाट' : कवी - भि. द. उशीर,
नीहारा प्रकाशन, पुणे

□

**आसक्ती-विरक्तीची कविता : अक्षरवेल**

'अक्षरवेल' हा नाना बापट यांचा










काव्यसंग्रह. सुमारे पन्नास कवितांच्या या संग्रहात प्रामुख्याने प्रेम आणि भक्ती या भावनांच्या कविता उल्लेखनीय आहेत.

अनेक प्रेम कवितांमध्ये कवी स्त्रीच्या प्रेमभावना व्यक्त करतो. परमन प्रवेशाची ही किमया कवीला चांगली जमली आहे. त्यांच्या कवितेतली नायिका आपली प्रेमभावना नजाकतीनं व्यक्त करते.

*'दोन जीवांचे झाले मीलन*
*नको म्हणू तू पाऊल चुकले*
*जगू आपुले आपण जीवन*
*नसता मागे मरणच उरले'*

किंवा

*'आण घातली तुला मी*
*पुन्हा भेटण्याची*
*उभी कधीची इथे मी*
*सोडून लाज जनाची'*

या ओळींमधून नाना बापट स्त्रीमनाची प्रेमात होणारी तफफड नेमकेपणानं टिपतात.

'सती गेली वात' या कवितेतील

*'दीपाच्या प्रेमापोटी*
*सती गेली वात*
*आता तिच्यासाठी*
*कोण गाईल गीत...'*

या ओळी स्त्रीच्या समर्पणाची महती सांगणाऱ्या आहेत.

'निर्माल्य', 'खिडकी', 'स्पर्श', 'स्वप्न पाचोळा', 'संकेत मीलनाचा' या कवितांमधून प्रेम, विरह, प्रणय यांचे दर्शन घडते.

*'किती मरण यातना सोसल्या,*
*कधी न पुसले मला*
*विसरून जा आता मला*
*मी कधीच विसरले तुला'*

असे म्हणणारी विरहव्याकुळ प्रेयसी अनेकदा दिसते. म्हणूनच बापटांची कविता ही तुमची-आमची सामान्यजनांची कविता वाटते.

'गीत झाले अभंग' आणि 'वीट' या कवितांमधून भक्ती-भावना व्यक्त झाली आहे. तसेच 'अंधश्रद्धा' या कवितेत कवीने विज्ञानाची कास धरली आहे.

काव्यसंग्रहात सामाजिक आशयाच्या तसेच निसर्ग कविताही आहेत.

'चक्रपाणी' या कवितेत त्या सर्वसाक्षी परमेश्वराचे अतिशय सुंदर वर्णन आहे.

या काव्यसंग्रहाला कवी वि. म. कुलकर्णी यांनी प्रस्तावना लिहिली आहे. ते आपल्या प्रस्तावनेत लिहितात, 'चक्रपाणी ही कविता मंतरवेडी खरी अक्षरवेल वाटते.'

शेवटी नाना बापट म्हणतात —

*'निवृत्तीचे वेध लागले, नाही राहिली हाव*
*खूप सोसले आणि भोगले, वाटे आता थांबावं.'*

'अक्षरवेल' : कवी - नाना बापट
साहित्यकलायात्री प्रकाशन, पुणे.

□

प्रभा सोनवणे
१३५/२, सोमवार पेठ, पुणे ४११ ०११.

---

## स्वागत

पुष्पलता रानडे यांनी लिहिलेली पुस्तके :
नाट्यरंग, गाऊ त्यांना आरती, कीर्तनकमल, स्मृतिगंध, गजरा, किलबिल,
या भेंड्या खेळूया : कै. लक्ष्मीबाई लेले
या सर्व पुस्तकांचे प्रकाशन 'पुष्पराज प्रकाशन', द्वारा संजीवन लॉज, लक्ष्मी रोड, पुणे ३०.










अनुक्रमणिका

१ जानेवारी ते ३१ मार्च १९९९

# कार्यवृत्त

□

राजा फडणीस, प्रमुख कार्यवाह

**कै. वि. स. खांडेकर स्मृतिव्याख्यान**

थोर साहित्यिक कै. वि. स. खांडेकर यांच्या जन्मदिनी, दिनांक ११ जानेवारी ९९ रोजी प्रसिद्ध कार्यकर्ते व माजी खासदार प्रा. राम कापसे यांचे 'साहित्यातील ध्येयवाद' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले होते.

**दिवाळी अंक पारितोषिक वितरण :**

१९९८ सालासाठी खालीलप्रमाणे दिवाळी अंकांना पारितोषिके जाहीर करण्यात आली.

अ. स. गोखले स्मृत्यर्थ रत्नाकर पारितोषिक : रुपये १,००१/-

अंकाचे नाव : ऋतुरंग

संपादक : श्री. अरुण शेवते

श्री. चंद्रकांत शेवाळे : संपादक ग्रहांकित : पुरस्कृत तीन पारितोषिके

विविध ज्ञानविस्तारकर्ते :

रावसाहेब मोरमकर पारितोषिक रु. १,०००/-

अंकाचे नाव : तरुणभारत, बेळगाव

संपादक : किरण ठाकूर, बेळगाव

मासिक मनोरंजनकार का. र. मित्र पारितोषिक : रुपये १,०००/-

अंकाचे नाव : अक्षरप्रतिष्ठा

संपादक : श्री. लक्ष्मीकांत देशमुख, परभणी

शं. वा. किर्लोस्कर यांच्या स्मरणार्थ पारितोषिक : रुपये १,०००/-

अंकाचे नाव : साहित्य सावाना

संपादक : श्री. भारद्वाज रहाळकर, नाशिक

सर्वोत्कृष्ट कथेसाठीचे दि. अ. सोनटक्के पारितोषिक — रुपये ५००/- .

कथेचे नाव : देणंघेणं

लेखिका : साधना कामत

अंकाचे नाव : कथाश्री

सर्वोत्कृष्ट ललित लेखासाठीचे

अनंत काणेकर पारितोषिक :

ललित लेखाचे नाव : काचांचा डोंगर

लेखिका : प्रमोदिनी वडके-कवळे

अंकाचे नाव : अंतर्नाद

यंदाचे वर्षी ही पारितोषिके सुप्रसिद्ध मुद्रक श्री. चिं. स. लाटकर यांच्या हस्ते दिनांक १५।१।९९ रोजी समारंभपूर्वक देण्यात आली. यावेळी परीक्षकांच्या वतीने डॉ. न. म. जोशी यांनी आपले विचार मांडले.

पारितोषिक प्राप्त संपादकांनी व लेखकांनीही आपापले मनोगत व्यक्त केले. या परीक्षक समितीवर सर्वश्री म. श्री. दीक्षित, न. म. जोशी, राजा फडणीस आणि नंदा सुर्वे यांनी काम पाहिले. प्रा. वीणा देव यांनी निमंत्रक म्हणून काम केले.



अनुक्रमणिका

**कै. वि. द. घाटे स्मृति व्याख्यान :**

कै. वि. द. घाटे यांच्या स्मृतिसाठी दि. १८।१।९९ रोजी डॉ. अ. रा. तोरो यांचे 'कर्नाटक आणि महाराष्ट्र : ऐतिहासिक व सांस्कृतिक भावबंध' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यत आले होते.

**कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत 'कै. चिं. वि. जोशी' पारितोषिक :**

दरवर्षीप्रमाणे यंदाही या वर्षातील उत्कृष्ट विनोदी पुस्तकाच्या लेखकास व त्या पुस्तकाच्या प्रकाशकास रु. १५००/- व रु. १०००/-चे कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत 'कै. चिं. वि. जोशी पारितोषिक' दि. १९।१।९९ रोजी सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. शिवाजी सावंत यांच्या हस्ते देण्यात आले. हे पारितोषिक श्री. नरेंद्र सिंदकर यांच्या 'पहिले पाढे पंचावन्न' या पुस्तकास देण्यात आले. या पुस्तकाचे प्रकाशक श्री. विनोद सोनवणी (पुष्प प्रकाशन लि.) यांना प्रकाशकाचे पारितोषिक देण्यात आले. यावेळी परीक्षकांचे वतीने प्रा. वसंत मिरासदार यांनी आपले विचार मांडले. परीक्षक म्हणून प्रा. वसंत मिरासदार व सौ. दीपा गोवारीकर यांनी काम पाहिले.

**राम गणेश गडकरी : ८० वा स्मृतिदिन :**

कै. राम गणेश गडकरी यांच्या ८० व्या स्मृतिदिनानिमित्त २३।१।९९ रोजी डॉ. मेधा सिथये यांचे 'रंगभूमी मासिकाचे ऐतिहासिक कार्य' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले होते.

**प्रा. रा. श्री. जोग स्मरणार्थ व्याख्यानमाला :**

पुणे विद्यापीठ मराठी विभागाच्या सहकार्याने १९ ते २१ फेब्रुवारी ९९ रोजी प्रा. रा. श्री. जोग यांच्या स्मरणार्थ व्याख्यानमाला आयोजित करण्यात आली होती. या तीन दिवसांत सुप्रसिद्ध लेखक श्री. विश्वनाथ खैरे यांची 'साहित्य - मिथ्य - साहित्य' या विषयावर व्याख्याने आयोजित करण्यात आली होती.

दि. १९।२।९९ रोजी प्रारंभी प्रा. रा. श्री. जोग समीक्षा परितोषिक डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांच्या हस्ते प्रा. के. रं. शिरवाडकर यांना त्यांच्या 'साहित्य विश्व' या पुस्तकासाठी देण्यात आले.

**कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत कविवर्य कुसुमाग्रज पारितोषिक :**

प्रतिवर्षी कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत सर्वोत्कृष्ट काव्यसंग्रहास रु. १५००/- त्या संग्रहाच्या प्रकाशकाला रु. १०००/- चा कुसुमाग्रज पुरस्कार देण्यात येतो.

या वर्षी हा पुरस्कार कवी सय्यद अल्लाउद्दीन यांच्या 'झिंदाबाद-मुर्दाबाद' या कवितासंग्रहास देण्यात आला. प्रकाशकाचे रु. १०००/- चे पारितोषिक श्रीमती सय्यद बेबीबानो अल्लाउद्दीन (दिलजान प्रकाशन) यांना देण्यात आले. ही पारितोषिके परिषदेचे अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या हस्ते दि. २७।२।९९ रोजी समारंभपूर्वक देण्यात आली. परीक्षकाचे वतीने डॉ. राजा दीक्षित यांनी आपले विचार प्रकट केले. परीक्षक म्हणून डॉ. अरविंद वामन कुलकर्णी व डॉ. राजा दीक्षित यांनी काम पाहिले.

गेल्या वर्षीपासून म. सा. परिषद व जागतिक मराठी अकादमी यांच्या संयुक्त विद्यमाने हा समारंभ आयोजित करण्यात येतो. या निमित्ताने सुप्रसिद्ध साहित्यिक/पत्रकार











श्री. माधव गडकरी यांचे 'मराठीची सद्यस्थिती व भवितव्य' या विषयावर व्याख्यान झाले.

**आंतरराष्ट्रीय महिलादिन :**

आंतरराष्ट्रीय महिला दिनानिमित्त दि. ८।३।९९ रोजी विशेष कवयित्री संमेलन डॉ. अश्विनी धोंगडे यांच्या अध्यक्षतेखाली आयोजित करण्यात आले होते. या कवी संमेलनाचा विषय 'स्त्री जाणिवेच्या कविता' हा होता. या कवयित्री संमेलनात, सर्वश्री संजीवनी बोकील, अंजली कुलकर्णी, संगीता जोशी, संगीता बर्वे, मनीषा दीक्षित, रोहिणी करंदीकर, इरावती आगटे, नीला शर्मा, आश्लेषा महाजन, मृणाल वैद्य, माधवी पटवर्धन, भारती पांडे, मीरा शिंदे आदि कवयित्रींनी भाग घेतला होता. कार्यक्रमाचे सूत्र-संचालन श्रीमती नंदा सुर्वे यांनी केले.

**कवी यशवंत जन्मशताब्दी समारंभ :**

दिनांक ९।३।१९९९ रोजी कवी यशवंत यांचा जन्मशताब्दीचा समारंभ सुप्रसिद्ध कवी श्री. शंकर वैद्य यांच्या अध्यक्षतेखाली, कवी यशवंतांच्या कुटुंबियांच्या सहकार्याने साजरा करण्यात आला. या वेळी प्रा. काशीताई पेंढरकर, सौ. चारुता पेंढरकर, शरद पेंढरकर व किशोर पेंढरकर यांनी कवी यशवंताच्या आठवणी सांगितल्या.

म. सा. परिषदेमार्फत प्रतिवर्षी देण्यात येणारे कवी यशवंत पारितोषिकाचे वितरणही यावेळी करण्यात आले. डॉ. सौ. वृषाली किन्हाळकर यांच्या 'वेदन' या कवितासंग्रहास रु. १०००/- चे पारितोषिक देण्यात आले. परीक्षकांच्या वतीने डॉ. राजा दीक्षित यांनी 'वेदन' या कवितासंग्रहाचे परीक्षण केले. परीक्षक म्हणून डॉ. अरविंद कुलकर्णी व डॉ. राजा दीक्षित यांनी काम पाहिले.

श्री. शंकर वैद्य यांनी कवी यशवंताच्या आठवणी सांगून त्यांच्या कवितेचे मर्मही समजावून सांगितले.

**शरदबाबू पुरस्कार वितरण :**

थोर भारतीय लेखक 'शरदबाबू' यांच्या स्मरणार्थ ज्येष्ठ लेखिका श्रीमती ज्योत्स्ना देवधर यांनी दिलेल्या देणगीतून दरवर्षी रु. ५०००/- चे पारितोषिक देण्यात येते. यंदाचे वर्षी हे पारितोषिक सौ. दीपा गोवारीकर यांच्या 'वसा' या कथासंग्रहाला, दि. १९।३।९९ रोजी सुप्रसिद्ध समीक्षक डॉ. सरोजिनी वैद्य यांच्या हस्ते देण्यात आले. परीक्षकांचे वतीने डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी आपले विचार प्रकट केले. परीक्षक म्हणून श्री. रंगा मराठे व डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी काम पाहिले.

**कविवर्य मर्ढेकर स्मृति व्याख्यान :**

कविवर्य मर्ढेकर स्मृतिदिनानिमित्त ज्येष्ठ समीक्षक डॉ. व. दि. कुलकर्णी यांचे 'केशवसुतांची कविता : नवे आकलन' या विषयावर दि. २०।३।९९ रोजी व्याख्यान आयोजित करण्यात आले होते.

**श्रद्धांजली :**

कविश्रेष्ठ कुसुमाग्रज यांचे १०।३।९९ रोजी दु:खद निधन झाले. त्यांना म. सा. परिषदेमार्फत दि. २२।३।९९ रोजी श्रद्धांजली अर्पण करण्यात आली. या वेळी अध्यक्षस्थानी परिषदेचे अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी होते. या सभेत प्रा. के. रं. शिरवाडकर, डॉ. स. रा. गाडगीळ, डॉ. वि. भा. देशपांडे, श्री. अनिरुद्ध कुलकर्णी, डॉ. माधवी वैद्य यांनी भाग घेतला. डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले. सभेच्या शेवटी श्री. रत्नाकर कुलकर्णी यांनी



अनुक्रमणिका

दुखवट्याचा ठराव वाचून दाखविला. सभेने नंतर २ मिनिटे स्तब्ध उभे राहून कविवर्य कुसुमाग्रज यांना श्रद्धांजली अर्पण केली.

**शाखावृत्तान्त**

**ठाणे शाखा :**

१. कविवर्य म. पां. भावे अमृत महोत्सव सोहळा १४ एप्रिल ९८ — अध्यक्षस्थानी सुप्रसिद्ध नाटककार सुरेश खरे होते. यावेळी त्यांनी त्यांच्या विडंबन काव्याचा गौरव केला. भा. ल. महावळ, अशोक चिटणीस, प्रवीण दवणे यांची यावेळी भाषणे झाली. सत्काराला उत्तर देताना भावे म्हणाले, 'साधे सरळ आयुष्य, माझी कविताही तशी, तळागाळातील माणसं यावी समजून ऐशी'. यावेळी भावेरचित 'अरे संसार संसार' हा विडंबन गीतांचा साग्रसंगीत कार्यक्रम झाला.

२. १९।७।९८ : शाखेचा १९ वा वर्धापन दिन डॉ. मीना वैशंपायन यांच्या 'शतकाच्या उंबरठ्यावरील मराठी साहित्य' या विषयावरील भाषणाने साजरा झाला.

३. २०/९/१९९८ : प्रा. म. वि. फाटक स्मृति-पुष्प वर्ष ११ वे. समीक्षक नीलिमा पालवणकर यांच्या 'मराठी कवितेतील स्त्री रूप' या विषयावरील भाषणाने गुंफले गेले. यावेळी त्यांनी संत कवींपासून अलिकडील संजय पवार, नीता भिसे यांच्या कवितेतील विविध स्त्रीरूपांचा अभ्यासपूर्ण आढावा घेतला.

४. २९।११।१९९८ : सुप्रसिद्ध कला दिग्दर्शक, नेपथ्यकार, चित्रकार, कवी, लेखक श्री. व्ही. सिन्नरकर यांचा अन्य संस्थांच्या सहकार्याने जाहीर सत्कार. या सत्कारात म. पां. भावे, महापौर प्रेमसिंह रजपूत, पद्माकर शिरवाडकर यांची गौरवपर भाषणे झाली.

५. २६ जानेवारी ९९ : विख्यात कवयित्री व संशोधक डॉ. अरुणा ढेरे यांच्या विविधांगी साहित्यातील गद्य उतारे व काही कवितांच्या प्रस्तुतीचा संगीतमय कार्यक्रम 'मनातलं आभाळ' या नावाने सुनंदा पत्की, सुहास पत्की, अंजली साने, विवेक साने (सर्व पुणेकर) व डॉ. भा. चिं. कढे, नीलिमा कढे, अविनाश हळवे यांनी सादर केला.

६. १३/२/९९ : शाखेद्वारा प्रकाशित 'मराठी साहित्य संशोधन : स्वरूप-विचार' या पुस्तकाचे डॉ. सरोजिनी वैद्य यांचे शुभहस्ते प्रकाशन. वक्ते प्रा. वसंत आबाजी डहाके व प्रा. डॉ. विजया टिळक.

७. २३।३।९९ : अन्य संस्थांच्या सहकार्याने कुसुमाग्रजांना आदरांजली वाहण्यात आली. अध्यक्षस्थानी न्या. राजाभाऊ गवांदे होते. तर प्रमुख वक्ते म्हणून प्रा. शंकर वैद्य होते.

**जळगाव शाखा :**

१. २३ जानेवारी, ९९ : 'संवाद' साहित्यिक गप्पांचा कार्यक्रम प्रमुख अतिथी कवी नारायण शिरसाळे. काव्यवाचन फुल्लर या विलास मोरे यांच्या काव्यसंग्रहावर चर्चा. वीस कवींचा सहभाग. प्रा. दिनेश पाटील कार्याध्यक्ष यांनी आभार मानले.

२. २० फेब्रुवारी, ९९ : पारितोषिक वितरण, कवयित्री बहिणाबाई काव्यस्पर्धा घेण्यात आली. पारितोषिक वितरण कवी राजा महाजन यांचे हस्ते करण्यात आले. परीक्षक म्हणून कवी नीळकंठ महाजन व वि. भा. नेमाडे यांनी काम पाहिले. प्रास्ताविक नारायण शिरसाळे, अध्यक्ष म. सा. प. यांनी व प्रा. दिनेश पाटील, कार्याध्यक्ष यांनी आभार मानले.










नंतर झालेल्या कविसंमेलनात ५० कवींनी भाग घेतला.

**इस्लामपूर शाखा :**

महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा - इस्लामपूर व राजाराम बापू ज्ञानप्रबोधिनी यांच्या संयुक्त विद्यमाने दि. २३ व २४ जानेवारी ९९ रोजी सातवे मराठी साहित्य संमेलनाचे आयोजन करण्यात आले होते. या संमेलनाचे अध्यक्ष प्रख्यात विचारवंत व संत साहित्याचे अभ्यासक डॉ. सदानंद मोरे हे होते. या संमेलनाचे उद्घाटन प्राचार्य विश्वास सायनाकर यांच्या हस्ते दीप प्रज्वलनाने झाले. स्वागताध्यक्ष प्राचार्य आर. डी. सावंत यांनी उपस्थितांचे स्वागत केले. प्रमुख पाहुण्यांचा परिचय महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष प्रा. प्रदीप पाटील यांनी करून दिला व अहवाल वाचन कार्यवाह प्रा. दशरथ पाटील यांनी केले. आभार प्रा. आर. वी. शिंदे यांनी मानले.

दुसऱ्या सत्रात कविसंमेलन झाले. कविसंमेलनाच्या अध्यक्षा अंजली कुलकर्णी, पुणे या होत्या. यामध्ये डॉ. अविनाश कांबळे, चैतन्य माने, संजय पाटील, शैला सायनाकर, चंद्रकांत देशमुख, विजय चोरमारे, सुभाष कवडे, प्रा. दीपक स्वामी, वासंती मेरू यांसह ७५ कवींनी सहभाग घेतला. रविवार दि. २४ जानेवारी ९९ रोजी संमेलनाध्यक्ष डॉ. सदानंद मोरे यांची प्रकट मुलाखत डॉ. रमेश वरखेडे व डॉ. दिलीप धोंगडे यांनी घेतली व दुसऱ्या सत्रात 'साठोत्तरी कालखंडातील वाङ्मयीन चळवळींची फलश्रुती' या विषयावर परिसंवाद झाला. त्यामध्ये डॉ. रमेश वरखेडे, जयदेव डोळे, डॉ. दिलीप धोंगडे व वामन काळे इ. मान्यवरांनी भाग घेतला. संमेलनाचे पूर्ण नियोजन म. सा. प. चे सांगली, सातारा प्रतिनिधी प्रा. शामराव पाटील यांनी केले व सूत्रसंचालन डॉ. दीपा देशपांडे यांनी केले.

**श्रीरामपूर शाखा :**

दि. ६ फेब्रुवारी ९९ रोजी श्रीरामपूर, अहमदनगर येथील आगाशे सभागृहात मुक्तांगण व्यसनमुक्ती केंद्र, पुणेचे मा. डॉ. अनिल अवचट यांचे 'व्यसनमुक्ती - एक चळवळ' या विषयावर व्याख्यान झाले.

लोकमान्य टिळक वाचनालय (सांस्कृतिक विभाग) ज्येष्ठ नागरिक आनंद मेळावा, आनंद मित्रमंडळ व श्रीरामपूर तालुका मेडिकल असोसिएशन यांच्या सहकार्याने हा कार्यक्रम घेण्यात आला. प्रारंभी श्रीरामपूर तालुका मेडिकल असोसिएशनचे अध्यक्ष डॉ. रवींद्र कुटे यांनी स्वागत व प्रास्ताविक केले. म. सा. प. शाखेच्या कोषाध्यक्षा प्रा. सौ. मंजिरी सोमाणी यांनी परिचय करून दिला. आनंद मित्र मंडळाचे भाऊकाका आगाशे यांनी पाहुण्यांचा सत्कार केला तर म. सा.प.चे कार्याध्यक्ष श्री. के. एल. खाडे यांनी आभार मानले.

**सोनई शाखा :**

मुळा सहकारी साखर कारखाना, सोनईचे कार्यस्थळावर महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा सोनईचे वतीने बुधवार दि. १७।३।१९९९ रोजी दुपारी ४.०० वाजता ज्ञानपीठ पुरस्कार प्राप्त व महाराष्ट्राचे भूषण असलेले कवी, नाटककार व लेखक वि. वा. शिरवाडकर तथा कुसुमाग्रज यांच्या निधनाबद्दल श्रद्धांजली सभा आयोजित करण्यात आली होती. या प्रसंगी प्राध्यापक डॉ. अशोकराव शिंदे, ज्ञानेश्वर महाविद्यालय, नेवासा यांनी वि. वा. शिरवाडकर तथा कुसुमाग्रज यांच्या जीवन चरित्राबद्दल व साहित्यकृतीबद्दल आपले मनोगत व्यक्त केले.



अनुक्रमणिका

सुरुवातीला सर्वांनी दोनमिनिटे स्तब्ध उभे राहून कुसुमाग्रज यांना आदरांजली वाहिली.

**पिंपरी-चिंचवड शाखा :**

दि. १६।१२।१९९८ बुधवार रोजी सायंकाळी ६ वाजता आमच्या पिं. चिं. शाखेने गुणवंत साहित्यिकांचा गौरव समारंभ आयोजित केला. तसेच 'मी दया बोलतोय' हा एकपात्री प्रयोग सादरकर्ते 'आनंद वल्लाळ' यांचा झाला. तसेच 'शब्द सूर रंगले' हा अरुण सूर्यवंशींचा संगीताचा कार्यक्रम झाला.

उपरोक्त कार्यक्रमास प्रमुख पाहुणे म्हणून मा. आयुक्त पिं. चिं., श्री. गणेश ठाकूर तसेच मा. किशोर निंबाळकर (सह. आयुक्त), प्रसिद्ध उद्योजक श्री. मकरंद बापट आणि देना बँकेचे मॅनेजर मा. रवि कुलकर्णी आदि मान्यवर उपस्थित होते. ❑

## स्वागत

❑ **पालकांशी सुसंवाद :** सुरेश धामणे, मधुकर प्रकाशन, पुणे, पृष्ठे १११

❑ **तौलनिक साहित्य नवे सिद्धांत आणि उपाययोजना :** डॉ. आनंद पाटील, मधुकर प्रकाशन, पुणे, पृष्ठे ४२६

❑ **इतिहास म्हणजे काय :** प्रा. वि. गो. लेले, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, पृष्ठे २०१

❑ **तणकट :** राजन गवस, मधुकर प्रकाशन, पुणे, पृष्ठे २३९

❑ **इंग्लिश प्रोनाऊंन्सेशन फॉर मराठी स्पिकर्स :** व्ही. व्ही. यार्दी, मधुकर प्रकाशन, पुणे, पृष्ठे १५२

❑ **स्वास्थ्य संवाद :** सुहास जेवळीकर, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १२०

❑ **छात्र प्रबोधन :** ज्ञान प्रवोधिनी, महेंद्र सेठीया ज्ञा. प्रवोधिनी, पुणे, पृष्ठे २००

❑ **अध्ययन क्षमता इ.३ भाषा व गणित :** चंद्रकांत कठारे, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ६०

❑ **चित्ती असो द्यावे समाधान :** द्वा. भ. कार्णिक, अनुभव प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १८५

❑ **निळोबांची अभंगवाणी :** डॉ. यशवंत साधू, कै. शंकरराव खंददारकर विश्वस्त संस्था, लातूर, पृष्ठे २४४

## प्रा. म. ना. अदवंत यांना श्रद्धांजली



महाराष्ट्र साहित्य परिषदेशी अनेक वर्षे विविध भूमिकांतून अत्यंत जवळचे संबंध असलेले परिषदेचे माजी कार्यवाह आणि त्यानंतर उपाध्यक्ष असलेले प्रा. म. ना. अदवंत यांचे रविवार दिनांक १६ मे ९९ रोजी दु:खद निधन झाले. ते ८५ वर्षांचे होते.

त्यांचे 'मनाचे संकल्प', 'मनाची मुशाफिरी', 'मनाली' असे लघुनिबंध संग्रह प्रकाशित झाले आहेत. 'मराठी लघुकथा' हा त्यांच्या खास अभ्यासाचा विषय होता. त्यांची 'मराठी लघुकथेचा इतिहास' आणि 'मराठी कथासाहित्य एक ओळख' ही पुस्तके प्रकाशित झाली आहेत. शाहिरी वाङ्मयाच्या 'पैंजण' या संग्रहाचे त्यांनी संपादन केले. तसेच ज्ञानेश्वरीचे ९ अध्यायही त्यांनी भालचंद्र खांडेकर यांचे समवेत संपादित केले.

१९९४ साली त्यांच्या ८० व्या वाढदिवसाच्या निमित्ताने त्यांच्या चाहत्यांनी खास गौरव समारंभ घडवून आणला होता व त्या निमित्ताने त्यांच्या कार्याचा परिचय करून देणारी एक स्मरणिकाही प्रकाशित केली होती.

परमेश्वर त्यांच्या आत्म्यास चिरशांती देवो, हीच प्रार्थना.

संपादक



## कुसुमाग्रजांची लेखनसंपदा

**काव्यसंग्रह :** जीवनलहरी, जाईचा कुंज (बालकाव्य) विशाखा, समिधा, किनारा, मेघदूत, मराठी माती, स्वगत, हिमरेषा, वादळवेल, रसयात्रा (संपादित), छंदोमयी, मुक्तायन, बालबोध मेवा, पाथेय, प्रवासी पक्षी, श्रावण (बालकाव्य), महावृक्ष, अक्षरबाग-बालकाव्य.

**नाटके :** नटसम्राट, दुसरा पेशवा, कौंतेय, वीज म्हणाली धरतीला, आनंद, आमचे नाव विदूषक, मुख्यमंत्री, एक होती वाघीण, चंद्र जिथे उगवत नाही, आमचं नाव बाबूराव, कैकेयी, ययाती आणि देवयानी.

**अनुवादित नाटके :** ऑथेल्लो, दूरचे दिवे, बेकेट, महंत, राजमुकुट (मॅक्बेथ), वैजयंता.

**कादंबरी :** वैष्णव, जान्हवी, कल्पनेच्या तीरावर.

**कविता संपादन :** काव्यवाहिनी - खंड १ ते ६, साहित्यसुवर्ण, फुलराणी, पिंपळपान, चंदणवेल.

**एकांकिका :** दिवाणी दावा, देवाचे घर, नाटक बसते आहे आणि इतर एकांकिका, कागदाच्या भिंती, कल्याणला पेशवाई.

**कथासंग्रह :** फुलराणी, सतारीचे बोल, काही वृद्ध आणि काही तरुण, प्रेम आणि मांजर, अपॉइंटमेंट, जादूची होडी, (बालकथा), कुसुमाग्रजांच्या बारा कथा.

**ललित निबंध :** आहे आणि नाही, विरामचिन्हे, प्रीतिसाद, वाटेवरच्या सावल्या ('विरामचिन्हे'चे नाव बदलून प्रकाशित), एकाकी तारा.

**समीक्षा :** रूपरेषा (भाषणे व लेख), शोध शेक्सपियरचा, साहित्यातील आग्रह आणि दुराग्रह (भाषण), कविता : एक खासगी बेट.

**ललित लेख :** मॅक्बेथमधील अंधार आणि प्रकाश, हे सारस्वताचे झाड.

**आठवणी :** वाटेवरच्या सावल्या.

प्रकाशाची दारे - 'मौज' दिवाळी अंक (१९५९), संघर्ष - 'सुगंध' दिवाळी अंक (१९६८), बेट - 'दीपावली' दिवाळी अंक (१९७०)

*(दै. सकाळच्या सौजन्याने)*



अनुक्रमणिका

Maharashtra Sahitya Patrika Quarterly April, May, June 1999.
Registered with the Registrar of Newspapers for India Under No. 6398/57